बंकिम साहित्य-माला – १०

# राजसिंह

## ( उत्तरार्ध )

[ संक्षेपित आवृत्ति ]

: लेखक :

बंकिमचंद्र चट्टोपाध्याय

: अनुवादक–संक्षेपक :

भा. वि. वरेरकर



नवभारत प्रकाशन संस्था, मुंबई ४.

: प्रकाशक :

रघुनाथ दिपाजी देसाई,
नवभारत प्रकाशन-संस्था,
९, केळेवाडी, गिरगांव, मुंबई ४.

★



★

आवृत्ति पहिली,
फेब्रुवारी १९५५

★

किंमत दोन रुपये

★

: मुद्रक :

रघुनाथ दिपाजी देसाई,
न्यू भारत प्रिंटिंग प्रेस,
९, केळेवाडी, गिरगांव, मुंबई ४.

# प्रस्तावना :

★ **बंकिमचंद्रांनीं** हा वेळपर्यंत ज्या कादंबऱ्या लिहिल्या त्यांत दुर्गेशनंदिनी, कपालकुंडला, मृणालिनी आणि चंद्रशेखर या कादंबऱ्यांत ऐतिहासिक वातावरण बऱ्याच मोठ्या प्रमाणांत उपयोगांत आणलें होतें, पण त्या सर्वस्वी 'ऐतिहासिक' या संज्ञेला पात्र नव्हत्या असें त्या काळच्या बऱ्याच समीक्षकांप्रमाणेंच स्वत: बंकिमबाबूंचेंही मत होतें. वर उल्लेखिलेल्या कादंबऱ्यांत बंगालच्या इतिहासाची पार्श्वभूमि घेतली होती. पण प्रस्तुत 'राजसिंह' या कादंबरींत रजपूतांचा इतिहास आहे.

१८७७ सालच्या 'वंगदर्शन' मासिकाच्या चैत्र अंकापासून १८७८ सालच्या भाद्रपद महिन्याच्या अंकापर्यंत ही कादंबरी प्रकाशित होत होती, पण ती अपूर्ण राहिली होती. ती १८८१ सालीं पूर्ण करण्यांत आली आणि १८८२ सालीं पुस्तक स्वरूपांत प्रसिद्ध झाली. या कादंबरीची पहिली आणि दुसरी आवृत्ति जवळ जवळ मोठ्याशा कथेइतकी होती. १८९३ सालच्या ऑगस्ट महिन्यांत ही विस्तृत स्वरूपांत पुन्हां लिहून प्रसिद्ध करण्यांत आली, त्याच आवृत्तीवरून हा अनुवाद केला आहे. पहिल्या आणि दुसऱ्या आवृत्तीची पृष्ठसंख्या नव्वद होती.

या चवथ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत बंकिमचंद्रांनीं म्हटलें आहे :—

" 'राजसिंह' च्या पूर्वीच्या तीन आवृत्त्या जरी ऐतिहासिक घटना अवलंबिलेल्या होत्या तरी त्या इतिहासांतील मोठमोठ्या प्रसंगांच्या घटना तुटपुंज्या स्वरूपांत दिल्या गेल्या होत्या. मोगल साम्राज्याचा मुख्य इतिहास म्हणजे हिंदूंबरोबर झालेला मोंगलांचा झगडा. मोंगलांच्या विरुद्धपक्षाला एका बाजूला रजपूत

होते आणि दुसऱ्या बाजूला मराठे होते. मराठ्यांचा इतिहास सर्वत्रांना माहित आहे. रजपूतांचें शौर्य विशेष असलें तरीही या देशांत ( बंगाल्यांत ) तो इतिहास तितकासा माहित नाहीं. स्वतंत्र इतिहास लिहायचा म्हणजे त्यांत अनेक विघ्नें आहेत. मुसलमान इतिहास-लेखक हिंदुद्वेषी आणि स्वजातीचे पक्षपाती. हिंदुंच्या गौरवाच्या कथा—विशेषतः त्यांचे चिरशत्रु जे रजपूत त्यांच्या कथा—मुसलमान लेखक दडपून टाकतात. मनूची नांवाचा एक व्हेनिसचा लेखक हा मोंगलांच्या काळांत भारतांत आला होता. त्यानें मोंगलसाम्राज्याचा इतिहास लिहिला होता, पण हे सर्व इतिहास एकमेकाशीं विसंगत आहेत. त्यांतल्या कोणत्या घटना खऱ्या आणि कोणत्या खोट्या हें निश्चित ठरवणें फार कठीण आहे.

" इतिहासलेखकाला जशीं बंधनें आहेत तशीं कादंबरीलेखकाला नाहींत. इतिहासाला न दुखावतां त्याला कल्पनेचा आश्रय करतां येतो.

" इंग्रजांच्या साम्राज्यांत हिंदूंचें बाहूबल लुप्त झालें, पण त्यापूर्वी तें झालें नव्हतें. हिंदूंचें बाहूबल हाच माझा प्रतिपाद्य विषय आणि त्याचें उदाहरण म्हणूनच मी ' राजसिंह ' घेतला आहे. मराठ्यापेक्षां रजपूत बाहुबलानें जास्त बलवान् होते असें मला वाटतें, पण राजकारणाचे डाव टाकण्यांत ते मराठ्यापेक्षां निकृष्ट होते.

" बाहूबलाचें प्रतिपादन करणें हाच या कादंबरीचा विशेष असल्यामुळें राजसिंह आणि मोंगल बादशहा यांचें जें युद्ध झालें त्याचा इतिहास या कथेंत देणें आवश्यक वाटल्यामुळें मला या कादंबरीची परिवर्धित आवृत्ती काढणें भाग पडलें आणि त्या अनुषंगानें माझ्या कल्पनेंतून निर्माण झालेले नवे प्रसंग मला या कथेंत समाविष्ट करावे लागले. युद्धाचा इतिहास देतांना मात्र कुठेंही कल्पनेवर भर देण्यांत आलेला नाहीं. औरंगजेब, राजसिंह, जेबुन्निसा, उदयपुरी या ऐतिहासिक व्यक्ती आहेत. त्यांचीं मूळ चरित्रें ऐतिहासिकच ठेवण्यांत आलीं आहेत.

" रूपनगरच्या राजकन्येच्या बाबतींत ज्या स्थूल घटना या कथेंत वर्णिल्या आहेत त्या ऑर्मेच्या ग्रंथांत आहेत, पण टॉडच्या ग्रंथांत नाहींत. त्या दोन्ही

ग्रंथांतील घटना खऱ्या समजून मी उपयोगांत आणल्या आहेत. खिडींत सांपडलेल्या औरंगजेबाच्या दूरवस्थेची कथा ऑर्मच्या ग्रंथांतून घेतली आहे, पण टॉडनें ही घटना शहाजाद्याची असल्याचें लिहिलें आहे.

" औरंगजेबाच्या राज्यांत नृत्यगीताला बंदी होती असें समजण्यांत येतें, पण त्याच्याच अंतःपुरांत हें बंधन मोडलें जात होतें हें ऐतिहासिक सत्य आहे.

" औरंगजेब स्वतः दारू पीत नसे, पण त्याचा बाप, आजोबा, चुलता आणि त्याचे भाऊ अत्यंत दारुबाज होते. त्यांच्या जमान्यांतील बायकाही दारुबाज असल्याचा पुरावा इतिहासांत आहे.

" शेवटीं सांगायचें असें, कीं मी यापूर्वी ऐतिहासिक कादंबरी लिहिली नव्हती. दुर्गेशनंदिनी, चंद्रशेखर आणि सीताराम या माझ्या कादंबऱ्यांना ऐतिहासिक म्हणतां येणार नाहीं. हीच माझी पहिली ऐतिहासिक कादंबरी. आजपर्यंत ऐतिहासिक कादंबरी लिहिण्याच्या कामीं कुठलाही लेखक संपूर्ण रूपानें कृतकार्य झालेला नाहीं—मीही झालों नाहीं हें सांगायला नको. "

बंकिमबाबूंच्या विस्तृत प्रस्तावनेंतील महत्त्वाचा भाग वर संक्षेपानें दिला आहे.

बंगालीखेरीज इतर भाषांत या कादंबरीचे अनुवाद झाल्याचें निश्चित कळत नाहीं. मराठींत भारतगौरव ग्रंथमालेंतील वा. गो. आपटे यांचा अनुवाद प्रसिद्ध आहे.

मराठी कथा-वाङ्मयाच्या दृष्टीनें विशेष रूपानें उल्लेख करण्याजोगी एक घटना आहे. हरि नारायण आपटे यांची ' रूपनगरची राजकन्या ' ही कादंबरी म्हणजे प्रस्तुत कादंबरीचें विस्तारित स्वरूप आहे.

प्रस्तुत कादंबरीला संक्षेप देतांना मला फार कठिण गेलें. मूळ कथा, त्यांतील प्रसंग, त्यांतील वर्णनें इतकीं हृदयंगम आहेत, कीं त्यांना संक्षेप देतांना मला दुःसह यातना झाल्या.

पहिल्यानें मुबारकला आणि नंतर औरंगजेबाला खिडींत पकडून राजसिंहानें जें वठणीला आणलें ती घटना शिवाजीमहाराजांच्या अशाच स्वरूपाच्या

लढाईच्या डावपेंचाशीं पुष्कळशीं तुल्यबल असल्याचें दिसून येतें. पावन खिंडींतल्या लढाईचा वीर जरी रणांगणावर पडला होता, तरीही मूठभर शिपायांनीं हजारों योद्धयांशीं लढाई देऊन त्यांना जेरीला आणल्याची ती घटना युक्तिबलाप्रमाणें बाहुबलाची निदर्शक नाहीं असें कोण म्हणेल ?

मराठ्यांच्या इतिहासावर एकादी कादंबरी लिहायला बंकिमबाबू हयात राहिले नाहींत हें महाराष्ट्राचें दुर्दैव होय. वर उल्लेखिलेल्या प्रस्तावनेंतील उद्गारांना महत्त्व द्यायचें तर अशी कल्पना त्यांना सुचली नसती असें म्हणवत नाहीं. या कादंबरीची ही चवथी आवृत्ति प्रसिद्ध झाल्यानंतर थोड्याच काळानें म्हणजे आठ एप्रिल १८९४ रोजीं बंकिमबाबू स्वर्गवासी झाले.

— मामा वरेरकर

# षष्ठ खंड

: १ :

राजसिंहानें औरंगजेबाला जें जळजळीत पत्र लिहिलें होतें त्याच्यापायींच पुढें आग पेटली. तिथूनच या खंडाचा आरंभ होत आहे. तें पत्र औरंगजेबापाशीं कुणी नेऊन द्यावें हें ठरविणें फार कठिण गेलें. राजदूत अवध्य समजला जातो. पण औरंगजेबाच्या हिशेबांत तें पाप नव्हतें. त्यानें अशा अनेक दूतांचा जीव घेतल्याचें जगजाहीर झालें होतें. ज्याला स्वतःच्या जिवाची भीति आहे; पण आलेल्या प्रसंगाला तोंड देऊन चतुराईनें जो आपला प्राण बचावूं शकणार नाहीं अशा माणसाला तें पत्र घेऊन पाठविण्याची राजसिंहाची तयारी नव्हती. अशा वेळीं माणिकलाल पुढें आला आणि त्यानें या कामासाठीं आपली योजना करावी अशी विनंती केली. योग्य माणूस पुढें आलेला पाहून राजसिंहानें त्या कामासाठीं त्याची योजना केली.

ही बातमी चंचलकुमारीला कळली तेव्हां तिनें निर्मलकुमारीला बोलावून घेतलें. चंचल निर्मलला म्हणाली, " तूं आपल्या नवऱ्याबरोबर कां जात नाहींस ? "

निर्मल आश्चर्यचकित होऊन म्हणाली, " कुठं जायचं ? दिल्लीला का ? कशासाठीं ? "

चंचल म्हणाली, " एक वेळ बादशहाच्या रंगमहालांत चक्कर मारून ये ना."

निर्मल म्हणाली, " तो मूर्तिमंत नरक आहे असं म्हणतात ना सारे लोक ? "

" तुला नरकांत जायचा प्रसंग केव्हां येणारच का नाहीं ?" चंचल म्हणाली, " गरीब बिचाऱ्या माणिकलालचा तूं जो रोज छळ करतेस त्यापायीं शेवटीं तुला नरकांत जावं लागेलच लागेल. "

निर्मल म्हणाली, "काय म्हणून? सुंदरशी मुलगी दिसली असं पाहून त्यांनीं कां माझ्याशीं लग्न केलं?"

चंचल म्हणाली, "तर काय त्यानं तुला झाडाखालीं पडून मरूं द्यायला हवं होतं?"

"मी तर त्यांना कांहीं बोलावलं नव्हतं!" निर्मल म्हणाली, "कशाला जाताहेत हे दिल्लीला? जातांना उगीच माझ्यासारखी अडगळ बरोबर नेऊन ते काय करणार आहेत तें सांग ना."

"उदयपुरी बेगमला माझं निमंत्रण-पत्र पोंचवायला हवं!" चंचल म्हणाली.

"कसलं निमंत्रण?" निर्मलनें विचारलें.

"हुक्का भरून द्यायचं!" चंचल म्हणाली.

"हो, खरंच!" निर्मल म्हणाली, "मी विसरलें होतें ती गोष्ट. सम्राटाच्या राणीनं तुझी सेवा केली नाहीं तर तुलाही एक भुताचा बोजा मिळायचा नाहीं."

"दूर हो चांडाळणी!" चंचल म्हणाली, "खरं पाहिलं तर मीच झालें आहें भुताचा बोजा. एक तर बादशहाची बेगम माझी दासी झाली पाहिजे नाहींतर मला तरी विष खाऊन जीव दिला पाहिजे. ज्योतिष्याचं भाकित आहे ना तें?"

"तें खरंच." निर्मल म्हणाली, "पण तूं पत्रांतून आमंत्रण दिलंस म्हणजे बेगम येणार आहे का इथं?"

"मुळींच नाहीं." चंचल म्हणाली, "कुठून तरी वाद उभा करायचा एवढाच आहे माझा उद्देश. एकदां लढा सुरू झाला कीं महाराण्याचा जय होईल आणि बेगम माझी दासी होईल असं माझं मन मला सांगतंय. दुसरं एक कारण आहे, तूं बेगमला पाहून एकदां तिला ओळखून येशील."

"ठीक आहे!" निर्मल म्हणाली, "पण हें काम कसं करायचं तें कांहीं मला कळत नाहीं. तुझी योजना काय आहे तें आधीं मला सांग."

"ऐक तर, मी सांगतें." चंचल म्हणाली, "जोधपुरी बेगमनं दिलेला पंजा ( शिक्का मोहर ) माझ्यापाशीं आहे तें तुझ्या ध्यानांत असेलच. हा पंजा घेऊन तूं जायचंस. त्या पंजाच्या खुणेवर तुला रंगमहालांत सहज प्रवेश करतां येईल. त्याच पंजाच्या आधारावर तूं जोधपुरी बेगमची प्रत्यक्ष गांठ घ्यायची आणि

तिला झालेली सर्व हकिकत कळवायची. उदयपुरी बेगमच्या नांवानं मी जें पत्र तुझ्यापाशीं देणार आहें तें तिला दाखवायचं अन् तिनं तें पत्र कोणत्या ना कोणत्या प्रकारें उदेपुरीपाशीं पोंचतं करायचं. कळलं ? ज्या बाबतींत तुझी अक्कल चालत नसेल तिथं तुझ्या नवऱ्याची थोडीशी अक्कल उसनी घे म्हणजे काम होऊन जाईल. "

" कळली त्यांची अक्कल ! " निर्मल म्हणाली, " मी अशी खंबीर बायको आहें म्हणूनच त्यांचा संसार चालला आहे ! " असें म्हणून ती हंसू लागली.

चंचलनें पत्र लिहिलें आणि तें निर्मलच्या हातीं दिलें.

निर्मलकुमारी आपल्या नवऱ्याबरोबर दिल्लीला जाण्याच्या तयारीला लागली.

: २ :

**या कामीं** विशेष तयारी करायची होती ती माणिकलाललाच. या तयारीचा एक नमुना त्यानें एके दिवशीं निर्मलकुमारीला दाखविला, तो पाहून ती चकित झाली. माणिकलालचे तोडलेलें बोट पुन्हां होतें तसें झालें होतें.

तिनें माणिकलालला विचारलें, " हें कसं काय झालं ? "

माणिकलाल म्हणाला, " हें बनवलं ! "

" कसं बनवल ? "

" हस्तिदंताचं आहे हें. बोटासारखं बोट बेमालूम तयार केलं आणि त्याच्यावर बकऱ्याच्या पातळ चामड्याची खोळ करून घातली. त्या खोळीला माणसाच्या कातडीसारखा रंग दिला. हें बोट वाटेल तेव्हां काढतां येतं आणि हवं तेव्हां जोडतां येतं. "

" पण हा एवढा उपद्व्याप कशासाठीं केला ? "

" तें तुला दिल्लीला गेल्यावर कळेल. " माणिकलाल म्हणाला, " दिल्लीला मला वेळोवेळीं वेषांतर करावे लागेल. बोट तुटलेल्या माणसाचं वेषांतर पचायचं नाहीं, म्हणूनच केव्हां बोट ठेवावं लागेल तर केव्हां काढावं लागेल. "

माणिकलालचं उत्तर ऐकून निर्मल नुसती हंसली.

यानंतर माणिकलालनें एका पिंजऱ्यांत एक पाळीव कबूतर घेतलें. हें कबूतर शिकविलेलें होतें. पत्र आणण्यानेण्याचें शिक्षण त्याला दिलेलें होतें. आतांच्या

युरोपमधल्या लढाईत अशा प्रकारच्या कबूतरांकडून दूताचें काम करून घेतलें जात होतें. पूर्वीच्या भारतांत देखील अशी शिकवलेलीं कबुतरें हें काम करीत असल्याचे पुरावे आहेत. त्या कबुतराकडून काम कसें करून घ्यायचें तें माणिकलालनें निर्मलकुमारीला समजावून सांगितलें.

त्यावेळीं दिल्लीच्या बादशहाकडे दूत पाठवायचा म्हणजे त्याच्याबरोबर कांहींतरी नजराणा पाठवायचा अशी रीत होती. इंग्लंड आणि पोर्तुगालप्रभृति देशांचे राजे सुद्धां अशा प्रकारचा नजराणा राजाला पाठवीत असत. या लोकाचाराला अनुसरून राजसिंहानेंही माणिकलालबरोबर अगदीं सामान्य असा नजराणा पाठवला होता. हा कांहीं मोठा सलोख्याचा प्रसंग नव्हता, म्हणून त्याच तोलाचा नजराणा माणिकलालबरोबर देण्यांत आला होता.

हे जे जिन्नस माणिकलालबरोबर देण्यांत आले होते त्यांत संगमरवरी दगडावर जडावाचें काम केलेले कांहीं जिन्नस होते. माणिकलालनें ते जिन्नस एका स्वतंत्र वाहनांत ठेवून नेले.

ठरल्या दिवशीं माणिकलाल आपल्या बायकोला बरोबर घेऊन निघाला. राणाजीनीं त्याच्याबरोबर आपलें आज्ञापत्र आणि बादशहाला उद्देशून लिहिलेलें पत्र दिलें होतें. त्याच्याबरोबर दासदासी, नोकर चाकर, हत्ती घोडे, उंट बैल, गाड्या, एक्के, डोल्या मेणे रिसाला वगैरे देण्यांत आला होता. ही मोहीम मोठ्या थाटाच्या स्वरूपांत करण्यांत आली होती.

हा प्रवास करायला माणिकलालला बरेच दिवस लागले. दिल्ली कांहीं कोस दूर राहिली असें पाहून माणिकलालनें त्याजागीं डेरा दिला. निर्मलकुमारी आणि सारा कबिला त्या छावणींत ठेवून एकच विश्वासू माणूस बरोबर घेऊन तो दिल्लीला जायला निघाला. यावेळीं त्यानें ते संगमरवरी जिन्नस देखील बरोबर घेतले होते.

बनावट बोट काढून त्यानें निर्मलकुमारीकडे दिलें. तो म्हणाला, “ मी उद्यां येईन. ”

निर्मलनें विचारलें, “ ही काय भानगड आहे ? एकटेच कां जातां ? ”

बरोबर घेतलेल्या संगमरवरी जिनसांपैकीं एक जिन्नस निर्मलकुमारीला दाखवून माणिकलाल म्हणाला, “ ही पहा खूण. या सर्व जिनसांवर अशीच एक खूण केलेली आहे ती नीट पाहून घे. ”

निर्मलनें विचारलें, " काय म्हणून ही खूण केली आहे ! "

माणिकलाल म्हणाला, " दिल्लींत तुझी माझी ताटातूट वारंवार होणार आहे. कदाचित् मला मोगलांच्या बंदींत पडायचाही प्रसंग येईल. एकमेकांचा पत्ता जर एकमेकांना लागला नाहीं तर बाजारांत जाऊन संगमरवरी जिन्नस विकणाऱ्या दुकानाची चौकशी कर. ज्या दुकानांत अशी खूण असलेले संगमरवरी जिन्नस आढळतील. तिथंच तुला माझा पत्ता लागेल. "

अशा प्रकारें निर्मलकुमारीला समज देऊन ते सारे जिन्नस घेऊन माणिकलाल दिल्लीला गेला. तिथें गेल्यावर त्यानें एक दुकान भाड्यानें घेतलें आणि तिथें हें दगडी जिनसांचें दुकान थाटून आणि त्या दुकानावर बरोबर नेलेल्या विश्वासू माणसाला दुकानदार म्हणून बसवून तो पुन्हां छावणींत आला.

परत आल्यावर त्यानें डेरा उठवला आणि सारा कबिला आणि रिसाला घेऊन निर्मलकुमारीसह तो पुन्हां दिल्लींत आला.

दिल्लींत आल्यावर त्यानें योग्य जागा पाहून तिथें डेरा दिला आणि आपण महाराण्याकडून आल्याचा संदेश त्यानें बादशहाकडे पाठवला.

: ३ :

● दुसऱ्या दिवशीं तिसऱ्या प्रहरीं औरंगजेब ज्यावेळीं आपल्या दरबारांत आला त्यावेळीं माणिकलाल त्याच्या समोर जाऊन हजर झाला. दिल्लीच्या बादशहाच्या या आम आणि खास दरबारांचे अनेक ग्रंथांत वर्णन आलें आहे. अर्थात् तें इथें देण्याची जरूरी नाहीं.

माणिकलाल प्रथम पहिल्या पायरीवर आला आणि त्यानें कुर्निसात केली. तो उठून उभा राहिला, एक पायरी चढला आणि त्यानें पुन्हां कुर्निसात केली. पुन्हां एक पायरी चढून त्यानें पुन्हां कुर्निसात केली. अशा प्रकारें तीन पायऱ्या चढून तो तख्त-ए-ताऊस समोर येऊन हजर झाला.

माणिकलालनें आपल्याबरोबर आणलेलें राजसिंहानें दिलेले नजराण्याचे सामान अन् जिन्नस बादशहापुढें अर्पण केले. या पाठविलेल्या वस्तूंत दोन तरवारी होत्या. एक तरवार म्यान केलेली होती आणि दुसरी नंगी होती. नंग्या तरवारीचा स्वीकार करून औरंगजेबानें नजराण्याचे बाकीचे सारे जिन्नस परत केले.

या बाईला भय दाखवून कांहीं होणार नाहीं, मार दिला तरी ही बधणार नाहीं, हें औरंगजेबाला पक्कें कळून आलें. यातना दिल्या तर कदाचित ती वठणीला येईल असें त्याला वाटलें, पण तसें करण्यापूर्वी एकदां तिला लालूच दाखवून तिच्या सहनशक्तीची परीक्षा घ्यावी असें त्यानें ठरवलें. तो म्हणाला, " ठीक आहे. मृत्यूला तूं भीत नाहींस—उपासालाही भीत नाहींस—ठीक आहे, तूं मागशील तेवढी धनदौलत तुला देतों. पण हा जो कांहीं प्रकार आहे तो मला तपशिलवार सांगून टाक. "

निर्मल म्हणाली, " रजपूताच्या बेटीला जशी मृत्युची पर्वा नाहीं तशी धनदौलतीचीही नाहीं. मी एक आपली गांवढळ मुलगी आहें. मला काय करायची आहे तुमची धनदौलत ? स्वतःच्या खुषीनं मला एकदां वाटेला लावा पाहूं. "

औरंगजेब म्हणाला, " दिल्लीच्या बादशहाला देतां येणार नाहीं असं कांहींसुद्धां नाहीं. त्याच्याकडे मागतां येण्याजोगं असं कांहींच का नाहीं तुझ्या हिशेबीं ? "

" आहे तर ! " निर्मल म्हणाली, " मला निर्विघ्न जायला परवानगी द्या."

" तेवढंच देतां येत नाहीं मला. " औरंगजेब म्हणाला, " त्याखेरीज दुसरं कांहींच का मागतां येण्याजोगं नाहीं तुला ? नीट विचार करून पहा. "

" मागण्याजोगं तसं आहे खरं. " निर्मल म्हणाली, " पण दिल्लीच्या बादशहाच्या भांडारांत तें रत्न नाहीं. "

" अशी काय आहे ही तुझी अजब वस्तू ? " औरंगजेबानें विचारलें.

निर्मल म्हणाली, " आम्ही हिंदु आहों खाविंद. या जगांत आम्ही भीत असतों केवळ एका धर्माला. आम्हाला हवा असतो केवळ आमचा धर्म. दिल्लीचा बादशहा आहे म्लेंछ—दिल्लीचा बादशहा आहे ऐश्वर्यशाली. आम्हाला हवं तें द्यायला दिल्लीच्या बादशहाकडे आहे कुठं ? अन् दिल्लीचा ऐश्वर्यशाली बादशहा आम्हां भिकाऱ्याकडून घेणार आहे तरी काय ? "

निर्मलकुमारीचें साहस आणि चातुर्य पाहून दिल्लीश्वराचा राग मावळून गेला होता. त्याला क्षणभर तिचें कौतुकही वाटलें होतें. पण या तिच्या शेवटच्या उद्गारांनीं त्याचा राग पुन्हां भडकला. तो म्हणाला, " ठीक ! ठीक ! आतां हें सारं विसरून जातों मी. "

तो एका तुर्की पहारेवालीला उद्देशून म्हणाला, " जा. बबर्जीखान्यांतून गोमांस घेऊन ये. आणि तुम्ही दोघी तिघी हिला घट्ट धरून ठेवून तें गोमांस हिच्या तोंडांत कोंबा."

तो हुकुम ऐकूनसुद्धां निर्मल भ्यायली नाहीं. ती म्हणाली, " ही आपली विद्या आम्हां लोकांना माहित आहे, खाविंद. या विद्येच्या जोरावरच आपण ही सुवर्णभूमि काबीज करून बसलां आहांत. गाईंचं खिल्लार समोर ठेवून हिंदूवर गोळी चालवून तुम्ही रजपूतांचा पराभव केला तेंही माहित आहे आम्हाला. नाहींतर रजपूतांच्या बाहुबलासमोर मुसलमानांची ताकद म्हणजे समुद्रापाशीं गोष्पद. आणखी एका गोष्टीची आठवण करून द्यायची आहे मला. ती विसरलां असाल तर मी पुन्हां सांगतें—बरोबर विष घेतल्याशिवाय रजपूतांच्या मुली घराबाहेर पाऊल टाकीत नाहींत तें माहित आहे का तुम्हाला ? माझ्यापाशीं असं एक जहाल विष आहे कीं आपले हे नोकर गोमांस घेऊन हा उंबरठा ओलांडायच्या पूर्वी मी जर तें तोंडीं घांतलं तर जिवंतपणीं माझ्या मुखीं केव्हांही गोमांस जाणार नाहीं. जहापन्हा, आपले वडीलभाऊ दारा शेको याचा जीव घेऊन त्याच्या दोन्ही बायका हिरावून घेण्यासाठीं तुम्ही गेलां होतां, त्यांत यश आलं का आपल्याला ? ती अधम खिस्ती बाई आपसुख आली खरी, पण ती दुसरी रजपूताची बेटी बादशहाच्या तोंडावर सात पैजारा मारून स्वर्गी निघून गेली ना ? मीही तशीच तुमच्या तोंडावर सात पैजारा मारून स्वर्गाची वाट धरीन."

बादशहा थक्क झाला. त्याच्या तोंडून शब्द बाहेर फुटेना. तो पृथ्वीपती होता, साऱ्या पृथ्वीवर त्याचा गौरव गाजत होता, त्याच्या दराऱ्यानें सारा भारत थरथर कांपत होता, त्या या साऱ्या भारताच्या दुश्मनाला या एका अनाथ, निस्सहाय अबलेपुढें अपमानित व्हावें लागलें—पराजित व्हावें लागलें.

औरंगजेबानें हा पराभव कबूल केला. त्याला वाटलें, ही बिनमोल हिरकणी आहे. ही नाहींशी करतां कामा नये. हिला आतां वशीभूत केलें पाहिजे. उघड तिला विचारतांना तो मोठ्या लाडिक स्वरांत म्हणाला, " तुझं नांव काय प्यारी ? "

निर्मलकुमारी हंसली. ती म्हणाली, " हें काय जहापन्हां, अजून एकादी

गेलें होतें. आपण कृपा करून जर एखादा शिपाई माझ्याबरोबर द्याल अन् त्याला मला महालापर्यंत पोंचवायला सांगाल तर फार उपकार होतील माझ्यावर."

कोतवालानें एका सशस्त्र शिपायाला बरोबर देऊन निर्मलला बादशहाच्या अंत:पुराकडे पाठवून दिलें. बादशहाच्या पट्टराणीचा पंजा पाहतांच खोजा लोकांनीं तिला कसलाच अडथळा केला नाहीं. निर्मलकुमारी आंत जात असतांना मोठ्या खुबीनें प्रत्येकाशीं भाषण करीत असल्यामुळें जोधपुरी बेगमेचा पत्ता लावणें तिला कठिण गेलें नाहीं.

बेगमेची भेट होतांच तिला प्रणाम करून तिनें पंजा दाखवला. तो पंजा पाहतांच बेगम दचकली. तिला बरोबर घेऊन ती एका एकांत जागीं गेली आणि मग तिला प्रश्न विचारूं लागली.

बेगमेनें विचारलें, " तुला हा पंजा कुठं मिळाला ? "

निर्मलकुमारी म्हणाली, " सर्व हकिकत मी आतां तपशीलवार सांगतें—"

पहिल्यानें तिनें आपला परिचय सांगितला. त्यानंतर देवी रूपनगरला कशी गेली आणि काय म्हणाली, त्याचप्रमाणें तिनें पंजा चंचलकुमारीला कसा दिला हेंही तिनें सांगितलें. त्यानंतर चंचलकुमारी आणि निर्मल या दोघींच्याही बाबतींत जें जें काय घडलें होतें तें तें तिनें सांगितलें. नंतर तिनें माणिकलालची हकिकत सांगितली. माणिकलालबरोबर निर्मल कशी आली आणि चंचलकुमारीचें पत्र तिनें कां आणलें तेंही सांगितलें. दिल्लीला आल्यानंतर ज्या ज्या आपत्ती आल्या त्यांचेंही तिनें निवेदन केलें. त्या आपत्तींतून तिनें कोणत्या चतुराईनें वाट काढून महालांत प्रवेश कसा केला तेंही तिनें सविस्तर सांगितलें.

ही सर्व हकिकत सांगून झाल्यावर निर्मलकुमारीनें उदेपुरी बेगमेला देण्यासाठीं चंचलकुमारीनें लिहिलेलें पत्र बेगमेच्या हातीं दिलें अन् म्हटलें, " हें पत्र उदेपुरी बेगमच्या हातीं कसं पोंचतं करायचं हीच मोठी अडचण आहे. तेंच विचारण्यासाठीं मी आपल्यापाशीं आलें आहें. "

बेगम म्हणाली, " त्याला तसाच उपाय केला पाहिजे. जेबुन्निसा बेगमचा हुकूम मिळवण्याचा प्रयत्न केला तर पेंचांत पडावं लागेल. रात्रींच्या वेळीं जेव्हां त्या साऱ्या चांडाळणी दारू पिऊन बेहोष होतील त्यावेळीं कांहींतरी

मार्ग काढतां येईल. आतां तूं माझ्या हिंदु दासींच्या मेळाव्यांत रहा. तिथं तुला हिंदुंचं अन्नपाणी मिळूं शकेल. "

निर्मलकुमारीनें कबुली दिली. बेगमेनें सांगितल्याप्रमाणें हुकूम फिरविला.

## : ४ :

● **बरीचशी** रात्र उलटून गेल्यावर जोधपुरी बेगमेनें निर्मलला पुढें काय करायचें तें सांगून एका तुर्की पहारेवालीबरोबर जेबुन्निसाच्या महालांत पाठवून दिलें. जेबुन्निसाच्या खोलींत प्रवेश केला त्यावेळीं जिकडेतिकडे अत्तर गुलाबाचा घमघमाट सुटला होता, राशीराशीनें फुलें पडलीं होतीं आणि गुडाखूचा सुवास सर्वत्र दरवळत होता. जिकडे तिकडे रत्नखचित आसनें, परांच्या गाद्या, किनखाबी वस्त्रें पाहून निर्मल चकित होऊन गेली. विशेषतः जेबुन्निसाच्या अंगावरील हिरे माणकांचे आणि फुलांचे चित्रविचित्र अलंकार पाहून आणि चंद्रसूर्यासारख्या उज्ज्वल सौंदर्याच्या प्रभेनें नटलेल्या त्या रूपवतीला पाहून ती मुग्ध झाली. आजुबाजूला हजर असलेल्या बायकांच्या मेळाव्यांत ती एकाद्या अप्सरेसारखी विराजमान झाली होती.

पण या अप्सरेचे डोळे त्यावेळीं धुन्द झाले होते. चित्त ठिकाणावर नव्हतें. दारूचा अंमल तिच्यावर पूर्णपणें बसला होता. निर्मलकुमारी येऊन तिच्यासमोर उभी राहिली तेव्हां कैफानें बोबड्या पडलेल्या वाणीनें तिनें विचारलें, " कोण तूं ? "

निर्मलकुमारी म्हणाली, " मी उदेपुरच्या राणीची दूती. "

जेबुन्निसेनें विचारलें, " मोगल बादशहाचे तख्त ए ताऊस घेऊन जायला का आली आहेस ? "

निर्मल म्हणाली, " नाहीं. मी पत्र घेऊन आलें आहें. "

जेबुन्निसेनें विचारले, " पत्र कशाला ? जाळून रोषनाई करायला ? "

निर्मल म्हणाली, " नाहीं. उदेपुरी बेगमसाहेबांना द्यायला. "

जेबुन्निसेनें विचारले, " ती जिवंत आहे कीं मरून गेली ? "

निर्मल म्हणाली, " अजून जिवंत आहे वाटतं. "

जेबुन्निसा म्हणाली, " ती केव्हांच गेली मरून. कुणीतरी या दासीला तिच्याकडे घेऊन जा पाहूं. "

जेबुन्निसेचें तें दारूच्या कैफांत झालेलें भाषण तुर्की पहारेवालीला नीटसें कळलें नाहीं. 'हिला यमाच्या घरीं पाठवून द्या' असें म्हणायचा तिचा उद्देश होता पण त्या तुर्की पाहरेवालीनें सरळ अर्थ घेतला आणि ती निर्मलला उदेपुरी बेगमेपाशीं घेऊन गेली.

तिथें गेल्यावर निर्मलला दिसून आलें कीं उदेपुरी बेगमेचे डोळेही तरारले होते. ती मोठमोठ्यानें हंसत होती. ती मोठ्या खुषींत होती. निर्मलनें खूप खालीं वांकून तिला सलाम केला तेव्हां उदेपुरीनें तिला विचारलें, "कोण आपण ?"

निर्मलनें उत्तर दिले, "मी उदयपूरच्या राणीची दूती. मी पत्र घेऊन आलें आहें."

उदेपुरी म्हणाली, "नाहीं—नाहीं. तूं फार्सी मुलुखाच । बादशहा आहेस. मोगल बादशहाच्या हातून मला काढून घेऊन न्यायला आला आहेस."

येत असलेलें हंसें आवरून निर्मलनें तें चंचलचें पत्र उदेपुरीच्या हातीं दिलें. तिनें तें उघडून पाहिलें आणि वाचल्यासारखें करून ती म्हणूं लागली, "काय लिहिलंय ? असं लिहिलंय, 'अय नाजनी ! प्यारे मेरे ! तुझी सुरत आणि दौलत पाहून मी एकदम बेहोष आणि दिवाणा झालों आहें. तूं धांवतच निघून ये आणि माझा कलिजा थंड कर.' ठीक आहे ! आतां तेंच करतें ! अलबत् हुजूरच्याबरोबर येतें. आपण जरा वाट पहा. मी थोडी शराब पिऊन नेतें. आपण थोडीशीं शराब मुलाहिजा कराल का ?—अच्छा शराब ! फिरंग्यांच्या वकिलानं नजर केलीय ही शराब. असली शराब आपल्या मुलखांत-सुद्धां पैदा होत नसते जनाब." असें म्हणून तिनें दारूचा पेला ओठाला लावला.

ती संधि साधून निर्मलकुमारीनें काढता पाय घेतला. ती तशीच तडक जोधपुरी बेगमेपाशीं येऊन हजर झाली.

उदेपुरी बेगमेच्यापाशीं घडलेली सारी हकीकत तिनें जोधपुरी बेगमला अक्षरशः सांगितली. ती ऐकून जोधपुरी बेगम हंसली अन् म्हणाली, 'उद्यां शुद्धीवर आली कीं ती पत्र वाचून पाहील. आतां तुला इथून पळून गेलं पाहिजे, नाहींतर उद्यां इथं आकांत माजायचा संभव आहे. मी तुझ्याबरोबर एक विश्वासू खोजा देतें. तो तुला या महालाबाहेर घेऊन जाईल आणि तुझ्या नवऱ्याच्या छावणींत पोंचती करील. तिथं तुझीं कुणी विश्वासू माणसं असलीं तर

त्यांना बरोबर घे अन् आजच्या आज दिल्ली सोडून चालती हो. तशीं कुणी माणसं नसलीं तर याच खोजाबरोबर तूं दिल्लीच्या हद्दिबाहेर जा. तुझा नवरा कदाचित् दिल्लीबाहेर जाऊन कुठं तरी तुझी वाट पहात बसलेला असेल. वाटेंत त्याची भेट झाली नाहीं तर हाच खोजा तुला उदयपुरपर्यंत जायला सोबत करील. खर्चाला तुझ्यापाशीं पैसे नसतील तर तेही द्यायची मी व्यवस्था करतें. पण सावध ! या प्रकरणांत माझं नांव येऊं देऊं नकोस. "

निर्मल म्हणाली, " किती झालं तरी मी रजपूताची मुलगी आहें. आपण निश्चिंत रहा. माझ्याकरवीं असा विश्वासघात व्हायचा नाहीं. "

जोधपुरी बेगमनें बनासी नांवाच्या एका विश्वासू खोजाला बोलावून घेतलें आणि पुढें काय काय करायचें तें त्याला तपशिलवार सांगितलें. नंतर तिनें विचारलें, " आत्तांच निघायची तयारी आहे का तुझी ? "

बनासी म्हणाला, " हो आहे. पण बेगमसाहेबांचं दस्तखत असलेला परवाना हातीं असल्याशिवाय हें साहस करणं मला कठिण जाईल. "

जोधपुरी म्हणाली, " तुला जसा परवाना हवा आहे तसा लिहून आण. मी बेगमसाहेबांचं दस्तखत करवून आणतें. "

खोजा परवाना लिहून घेऊन आला तेव्हां तो त्याच तुर्की पहारेवाल्याच्या हातीं देऊन जोधपुरी म्हणाली, " याच्यावर बेगमसाहेबांचं दस्तखत करून घेऊन ये. "

पहारेवालीनें विचारलें, " कसला परवाना म्हणून विचारलं तर काय सांगूं ?"

जोधपुरी म्हणाली, " तिला म्हणावं, माझी कत्तल करायचा परवाना आहे हा. पण जातांना शाई लेखणी घेऊन जा म्हटलं. "

पहारेवाली शाई लेखणीसहित परवाना घेऊन जेबुन्निसेपाशीं गेली. तिनें तो पुढें केला त्यावेळीं जेबुन्निसा तशीच रंगांत होती. तिनें विचारलें, " कसला परवाना ? "

पहारेवाली म्हणाली, " माझी कत्तल करायचा परवाना. "

बेगमेनें विचारलें, " काय केलंस ? चोरी केलीस ? "

पहारेवाली म्हणाली, " हो. हजरत उदेपुरी बेगमेचा पेशवाज चोरला मी."

जेबुन्निसा म्हणाली, " छान केलंस ! कत्तल केली कीं तो घाल अंगावर ! "

असें म्हणून बेगमसाहेबानें त्या परवान्यावर सही केली. त्यावर मोहर करून पहारेवालीनें तो जोधपुरी बेगमेपाशीं आणून दिला.

तो परवाना घेऊन बनासी निर्मलला बरोबर घेऊन जोधपुरीच्या महाला-बाहेर पडला. निर्मलही मोठ्या खुषींत येऊन त्या खोजाबरोबर निघाली.

पण थोड्याच वेळांत तिची ती खुषी एकदम मावळली. रंगमहालाच्या दरवाज्यापाशीं येतांच तो खोजा घाबरून स्तंभित होऊन एकदम थबकला. तो पुटपुटला, " अरे बापरे ! आतां पळ ! आतां पळ ! " असें म्हणून त्यानें स्वतःच पळ काढला.

: ५ :

● कां पळावें याची निर्मलला कल्पना आली नाहीं. तिनें इकडे तिकडे पाहिलें—पळण्याजोगें असें तिथें कांहींच घडलेलें तिला दिसून आलें नाहीं. मात्र एक प्रौढ वयाचा पांढरा शुभ्र पोशाख केलेला माणूस दारासमोर उभा राहिलेला तिच्या दृष्टीस पडला. तिला प्रश्न पडला, यालाच पाहून कां खोजा पळाला ? हें भूतपिशाच्च आहे असें कां त्याला वाटलें ? निर्मलचा भुताखेतांवर विश्वास नव्हता, त्यामुळें ती घाबरली नाहीं. ती तशीच उभी राहून इकडे तिकडे पहात होती. तितक्यांत तो शुभ्रवेषधारी पुरुष निर्मलच्या समोरून जात असतांना थांबला आणि तिला पाहून त्यानें विचारलें, " कोण तूं ? "

निर्मल म्हणाली, " मी असेन अशीच कुणीतरी. "

" तूं कुठं जायला निघाली आहेस ? "

" बाहेर ! "

" कां ? "

" माझं काम आहे. "

" कांहींतरी काम असल्याशिवाय कुणी कुठं जात नाहीं तें मला माहित आहे. कसलं काम आहे तुझं ? "

" मी सांगणार नाहीं. "

" आतां कोण होतं का तुझ्याबरोबर ? "

" मी सांगणार नाहीं. "

" तूं हिंदुची मुलगी दिसतेस. तुझी जात काय ? "

" रजपूत. "

" तूं जोधपुरी बेगमेच्या तैनातींत असतेस का ? "

जोधपुरी बेगमेचें नांव कुणाच्याही समोर उच्चारायचें नाहीं असा निर्मलनें आपल्या मनाशीं निश्चय केला होता. तसें केलें तर बेगमेवर आपत्ती आली असती असें तिला वाटत होतें म्हणून ती म्हणाली, " मी इथं राहणारी नव्हे. मी आजच इथें आलें. "

त्या पुरुषानें विचारलें, " कुठून आली आहेस ? "

निर्मलनें विचार केला, खोटें कां बोलावें ! हा माणूस काय करणार आहे आपलें ! रजपूताच्या बेटीनें कुणाच्या तरी भीतीनें कां म्हणून खोटें बोलावें ! अर्थात् तिनें उत्तर दिलें, " मी उदयपूरहून आलें आहें. "

" कां आली आहेस ? " त्या पुरुषानें विचारलें.

निर्मलला वाटलें, याला काय म्हणून सारें कांहीं सांगावें ! ती म्हणाली, " त्याची उठाठेव तुम्हाला कशाला ! असे प्रश्न करीत बसण्यापेक्षां मला जर या फाटकापलिकडे नेऊन पोंचवाल तर माझ्यावर फार उपकार होतील. "

तो पुरुष म्हणाला, " तुला मी जें विचारतों आहें त्याची जर समाधानकारक उत्तरें दिलींस तर तुला मी या फाटकापलिकडे नेऊन पोंचवीन. "

निर्मल म्हणाली, " तुम्ही कोण आहां तें कळल्याशिवाय मी तुमच्या प्रश्नांना मुळींच उत्तर देणार नाहीं. "

तो पुरुष म्हणाला, " मी अलमगीर बादशहा. "

निर्मलला तो जुना प्रसंग आठवला—चंचलकुमारीनें पायाखालीं तुडवलेल्या त्या तसबिरींतला चेहराही तिच्या नजरेसमोर उभा राहिला. तिनें जीभ चावली. ती आपल्याशींच म्हणाली, ' हो—तोच दिसतोय हा ! '

जमिनीला हात लावून निर्मलकुमारीनें बादशहाला रीतसर सलाम केला. ती हात जोडून उभी राहिली आणि म्हणाली, " हुकुम व्हावा खाविंद. "

बादशहानें विचारलें, " इथं कुणाकडे आली होतीस ? "

" हजरत बादशहाबेगम उदेपुरीसाहेबापाशीं. "

" काय म्हटलंस ? उदयपुरहून उदेपुरीपाशीं आली होतीस ! कशाला ? "

" एक पत्र होतं. "

" कुणाचं पत्र ? "

" महाराण्याच्या पट्टराणीचं. "

" कुठं आहे तें पत्र ? "

" हजरत बेगमसाहेबांना तें पत्र दिलं मी. "

बादशहाला फार आश्चर्य वाटलें. तो म्हणाला, " चल माझ्याबरोबर. "

निर्मलला बरोबर घेऊन बादशहा उदयपुरीच्या महालांत आला. त्यानें निर्मलला दारापाशीं उभ केले आणि पहारेवालीला सांगितलें, " हिला सोडूं नकोस. "

तो उदेपुरीच्या शेजघरांत आला त्यावेळीं उदेपुरी गाढ झोंपी गेली होती. निर्मलनें आणलेलें तें पत्र फारशींत लिहिलेलें होतें. तें पत्र घेऊन औरंगजेबानें वाचून पाहिलें.

तें पत्र वाचतांच औरंगजेब रागानें भडकला. उसळत्या ज्वालामुखीसारखा सळसळत तो बाहेर आला आणि निर्मलला म्हणाला, " तूं या महालांत कसा प्रवेश केलास तें आधीं मला सांग. "

हात जोडून निर्मल म्हणाली, " दासीच्या अपराधाची क्षमा असावी—मी या प्रश्नाचं उत्तर देणार नाहीं. "

औरंगजेब चकित झाला. तो म्हणाला, " एवढी हिमाकत आहे का तुझी ? मी या दुनियेचा बादशहा—मी तुला प्रश्न करतों आहें अन् तूं उत्तर देणार नाहीं म्हणतेस ? "

पुन्हां हात जोडून निर्मल म्हणाली, " दुनिया हुजूरची आहे खरी, पण वाचा माझी आहे. जो शब्द तोंडावाटे बाहेर काढायचा नाहीं असं मी म्हणेन, तो शब्द माझ्या तोंडून वदवायची दुनियेच्या बादशहाचीसुद्धां शहामत नाहीं."

औरंगजेब म्हणाला, " बोलायचं नसेल तर बोलूं नकोस. पण ज्या जिभेची तूं बढाई मारते आहेस ती त्या तुर्की पहारेवालीकडून कापून घेऊन मी कुत्र्याला खायला घालीन तें माहित आहे तुला ? "

" दिल्लीश्वराची मर्जी ! " निर्मल म्हणाली, " पण आपण माझी जीभ कापली, तर जी माहिती आपल्याला पाहिजे आहे ती मिळायचा मार्ग कायमचा बंद होईल हें आहे का आपल्या ध्यानांत ? "

" म्हणूनच तुझी जीभ शाबूत ठेवतोंय मी ! " औरंगजेब म्हणाला, " आतां तुला गोणपटांत बांधून या पहारेवाल्या हळूहळू भाजून काढतील. तसा हुकूम देतों आहें मी. माझ्या हुकमानं तूं बोलली नाहींस तर आगीचे चटके मिळाले म्हणजे आपोआप तुझी दांतखीळ उघडेल. "

निर्मल कुमारी हंसली आणि म्हणाली, " हिंदुची मुलगी आगींत जळून मरायला भीत नाहीं. हिंदुच्या मुली नवऱ्याच्या जळत्या चितेवर हंसत हंसत चढून स्वतःला जाळून घेत असतात हें हिंदुस्थानच्या बादशहानं कधीं नाहीं का ऐकलं ? जाळून मारायचं भय कुणाला दाखवतां ? माझी आई, आजी आणि त्या आजीची आजीसुद्धां अशीच चितेवर जळून मेल्यात. आणि त्या माझ्या वाडवडिलांसारखीच ईश्वराच्या कृपेनं मीही माझ्या पतीच्याशेजारीं राहून आगींत जिवंत जाळून घेईन, अशीच इच्छा आहे माझी. "

बादशहानें मनांतल्या मनांत तिला वाहवा दिली. तो उघड म्हणाला, " ही चर्चा आपण सावकाश करूं. सध्यां मी तुला या महालांतल्या एका कोठडींत कडीकुलुपांत ठेवायचा हुकूम देतों आहें. भुकेतहानेनें व्याकुळ झालीस, खायला कांहीं मिळालं नाहीं, प्राण अगदीं कंठाशीं आले आतां निभाव लागत नाहीं असं तुला वाटलं, कीं दारावर आंतून थाप मार.—पहारेवाले दार उघडून तुला माझ्यापाशीं घेऊन येतील, त्यावेळीं माझ्या प्रश्नांचीं सरळ सरळ उत्तरं दिलींस कीं तुला अन्नपाणी देण्यांत येईल. "

निर्मल म्हणाली, " शहानशहा, मी एक प्रश्न विचारतें. हिंदुच्या बायका व्रतंवैकल्यं करतात तें कधीं कानीं गेलंय का तुमच्या ? तें व्रतनियम पाळण्यासाठीं त्या एक एक, दोन दोन, तीन तीन दिवस तोंडांत पाणीसुद्धां न घालतां —आमच्यांतल्या कांहीं कांहीं बायका तर अनियमित कालपर्यंतसुद्धां—उपवास करतात, इतकंच नव्हे, तर इच्छापूर्वक उपास करून केव्हां केव्हां प्राणही देतात, तें माहीत नाहीं का तुम्हाला ? त्यांतलीच ही एक दासी आहे जहांपन्हा. वाटेल तर माझी परिक्षा घ्या. मरेपर्यंत मला उपाशीं ठेवा. "

या बाईला भय दाखवून कांहीं होणार नाहीं, मार दिला तरी ही बधणार नाहीं, हें औरंगजेबाला पक्कें कळून आलें. यातना दिल्या तर कदाचित ती वठणीला येईल असें त्याला वाटलें, पण तसें करण्यापूर्वी एकदां तिला लालूच दाखवून तिच्या सहनशक्तीची परीक्षा घ्यावी असें त्यानें ठरवलें. तो म्हणाला, " ठीक आहे. मृत्यूला तूं भीत नाहींस—उपासालाही भीत नाहींस—ठीक आहे, तूं मागशील तेवढी धनदौलत तुला देतों. पण हा जो कांहीं प्रकार आहे तो मला तपशिलवार सांगून टाक. "

निर्मल म्हणाली, " रजपूताच्या बेटीला जशी मृत्युची पर्वा नाहीं तशी धनदौलतीचीही नाहीं. मी एक आपली गांवढळ मुलगी आहें. मला काय करायची आहे तुमची धनदौलत ? स्वतःच्या खुषीनं मला एकदां वाटेला लावा पाहूं. "

औरंगजेब म्हणाला, " दिल्लीच्या बादशहाला देतां येणार नाहीं असं कांहींसुद्धां नाहीं. त्याच्याकडे मागतां येण्याजोगं असं कांहींच का नाहीं तुझ्या हिशेबीं ? "

" आहे तर ! " निर्मल म्हणाली, " मला निर्विघ्न जायला परवानगी द्या."

" तेवढंच देतां येत नाहीं मला. " औरंगजेब म्हणाला, " त्याखेरीज दुसरं कांहींच का मागतां येण्याजोगं नाहीं तुला ? नीट विचार करून पहा. "

" मागण्याजोगं तसं आहे खरं. " निर्मल म्हणाली, " पण दिल्लीच्या बादशहाच्या भांडारांत तें रत्न नाहीं. "

" अशी काय आहे ही तुझी अजब वस्तू ? " औरंगजेबानें विचारलें.

निर्मल म्हणाली, " आम्ही हिंदु आहों खाविंद. या जगांत आम्ही भीत असतों केवळ एका धर्माला. आम्हाला हवा असतो केवळ आमचा धर्म. दिल्लीचा बादशहा आहे म्लेंछ—दिल्लीचा बादशहा आहे ऐश्वर्यशाली. आम्हाला हवं तें द्यायला दिल्लीच्या बादशहाकडे आहे कुठं ? अन् दिल्लीचा ऐश्वर्यशाली बादशहा आम्हां भिकाऱ्याकडून घेणार आहे तरी काय ? "

निर्मलकुमारीचें साहस आणि चातुर्य पाहून दिल्लीश्वराचा राग मावळून गेला होता. त्याला क्षणभर तिचें कौतुकही वाटलें होतें. पण या तिच्या शेवटच्या उद्गारांनीं त्याचा राग पुन्हां भडकला. तो म्हणाला, " ठीक ! ठीक ! आतां हें सारं विसरून जातों मी. "

तो एका तुर्की पहारेवालीला उद्देशून म्हणाला, " जा. बबर्जीखान्यांतून गोमांस घेऊन ये. आणि तुम्ही दोघी तिघी हिला घट्ट धरून ठेवून तें गोमांस हिच्या तोंडांत कोंबा."

तो हुकुम ऐकूनसुद्धां निर्मल भ्यायली नाहीं. ती म्हणाली, " ही आपली विद्या आम्हां लोकांना माहित आहे, खाविंद. या विद्येच्या जोरावरच आपण ही सुवर्णभूमि काबीज करून बसलां आहांत. गाईचं खिल्लार समोर ठेवून हिंदूवर गोळी चालवून तुम्ही रजपूतांचा पराभव केला तेंही माहित आहे आम्हाला. नाहींतर रजपूतांच्या बाहुबलासमोर मुसलमानांची ताकद म्हणजे समुद्रापाशीं गोष्पद. आणखी एका गोष्टीची आठवण करून द्यायची आहे मला. ती विसरलां असाल तर मी पुन्हां सांगतें—बरोबर विष घेतल्याशिवाय रजपूतांच्या मुली घराबाहेर पाऊल टाकीत नाहींत तें माहित आहे का तुम्हाला ? माझ्यापाशीं असं एक जहाल विष आहे कीं आपले हे नोकर गोमांस घेऊन हा उंबरठा ओलांडायच्या पूर्वी मी जर तें तोंडीं वांतलं तर जिवंतपणीं माझ्या मुखीं केव्हांही गोमांस जाणार नाहीं. जहापन्हा, आपले वडीलभाऊ दारा शेको याचा जीव घेऊन त्याच्या दोन्ही बायका हिरावून घेण्यासाठीं तुम्ही गेलां होतां, त्यांत यश आलं का आपल्याला ? ती अधम खिस्ती बाई आपसुख आली खरी, पण ती दुसरी रजपूताची बेटी बादशहाच्या तोंडावर सात पैजारा मारून स्वर्गी निघून गेली ना ? मीही तशीच तुमच्या तोंडावर सात पैजारा मारून स्वर्गाची वाट धरीन."

बादशहा थक्क झाला. त्याच्या तोंडून शब्द बाहेर फुटेना. तो पृथ्वीपती होता, साऱ्या पृथ्वीवर त्याचा गौरव गाजत होता, त्याच्या दराऱ्यानें सारा भारत थरथर कांपत होता, त्या या साऱ्या भारताच्या दुश्मनाला या एका अनाथ, निस्सहाय अबलेपुढें अपमानित व्हावें लागलें—पराजित व्हावें लागलें.

औरंगजेबानें हा पराभव कबूल केला. त्याला वाटलें, ही बिनमोल हिरकणी आहे. ही नाहींशी करतां कामा नये. हिला आतां वशीभूत केलें पाहिजे. उघड तिला विचारतांना तो मोठ्या लाडिक स्वरांत म्हणाला, " तुझं नांव काय प्यारी ? "

निर्मलकुमारी हंसली. ती म्हणाली, " हें काय जहापन्हां, अजून एकादी

रजपूत राणी आणायची हौस आली आहे का तुम्हाला ? ती हौस इथं पुरी पडायची नाहीं. मी विवाहित आहें. माझा हिंदु पति हयात आहे."

" बरं बरं. ठीक आहे ! " औरंगजेब म्हणाला, " सध्यां कांहीं दिवस तूं या आमच्या वाड्यांत रहा तर खरी ! हा एवढा हुकूम तरी तूं अमान्य करूं नयेस. "

" मला कां अशी अटकेंत ठेवतांहां ? " निर्मलनें विचारलें.

औरंगजेब म्हणाला, " यावेळीं तूं आपल्या मुलखांत गेलीस तर माझी नुसती निंदाच करशील. यापुढं तूं माझी तोंड भरून प्रशंसाच करशील असंच वर्तन ठेवणार आहें मी तुझ्या बाबतींत—नंतर मग तुला मी खुशाल मोकळी करीन. "

निर्मल म्हणाली, " तुम्ही मला आपखुषीनं सोडून दिलं नाहीं तर मला इथून जातां येणार नाहीं याची मला जाणीव आहे. पण आपण माझ्या कांहीं मागण्या मान्य केल्या तर मी कांहीं दिवस इथं राहीन देखील. "

" काय काय आहेत तुझ्या मागण्या ? " औरंगजेबानें विचारलें.

" हिंदुच्या हातच्या अन्नपाण्याखेरीज मी इतरांच्या हातच्या अन्नाला स्पर्श-सुद्धां करणार नाहीं. "

" कबूल ! " औरंगजेब म्हणाला.

" कुणाही मुसलमानानं मला स्पर्श करतां कामा नये. " निर्मल म्हणाली.

" तेंही कबूल. "

" मी कुणा रजपूत बेगमेपाशींच राहीन. " निर्मल म्हणाली.

" तेंच करणार आहें मी. " औरंगजेब म्हणाला, " मी तुला जोधपुरी बेगमेपाशीं ठेवून देणार आहें. "

कबूल केल्याप्रमाणें बादशहानें निर्मलकुमारीची व्यवस्था करून दिली.

## : ६ :

● **दुसऱ्या** दिवशीं औरंगजेबानें जेबुन्निसेसमोर निर्मलकुमारीला आणलें आणि चौकशीला सुरवात केली. अन्तःपुरांत तिला कुणी आणलें हेंच त्याला कळून घ्यायचें होतें. अन्तपुरांतले सारे खोजे, साऱ्या तुर्की दासी यांना बोलावून

आणून त्यानें प्रश्न करायला सुरवात केली. ज्यांनीं निर्मलकुमारीला आंत येऊं दिलें होतें त्यानीं तिला ओळखलें. पण तशी कबुली दिली तर आपल्यावर भलता प्रसंग येईल या भीतीनें कुणी तिला ओळखसुद्धां दाखवली नाहीं. सारे प्रयत्न फुकट गेले. औरंगजेब आणि जेबुन्निसा यांना शेवटीं कांहीं पत्ता लागला नाहीं. यानंतर औरंगजेबानें आणि जेबुन्निसेनें सर्वांना हुकूम सोडला तो असा, " ही बाई आंत आल्यानं तसं कांहींच बिघडलं नाहीं, पण यापुढें मात्र आमच्या हुकुमाशिवाय हिला कुणीही बाहेर जाऊं देतां कामा नये. मात्र कुणीही हिचा अपमान करायचा नाहीं कीं निष्कारण त्रासही द्यायचा नाहीं. बेगमेइतकाच सर्वत्रांनीं हिला मान द्यावा. जोधपुरी बेगमेच्या हिंदु दासीच्या हातचं शुद्ध अन्नपाणी हिला देण्यांत यावं आणि कुणाही मुसलमानानं हिला स्पर्श करूं नये. " बादशहाचा तो हुकूम ऐकतांच सर्वत्रांनीं निर्मलकुमारीला सलाम केला. जेबुन्निसेनें मोठ्या आदरानें तिला आपल्या महालांत बसवून घेतलें आणि तिच्याशीं अघळपघळ गप्पा मारायला सुरवात केली, पण कांहीं केलें तरी तिला निर्मलेचा अंत लागला नाहीं.

त्या दिवशीं तिसऱ्या प्रहरीं एक तुर्की पहारेवाली जोधपुरी बेगमेपाशीं आली आणि एक सौदागर संगमरवरी माल घेऊन वाड्यांत व्यवसायासाठीं आला आहे असें सांगितलें. त्यानें आणलेला माल महालांत आणून सर्व बेगमांना दाखविण्यांत आला, पण त्यांतल्या वस्तू तितक्याशा चांगल्या नसल्यामुळें कुठल्याही बेगमेनें त्या पसंत केल्या नाहींत. पहारेवालीनें विचारलें, " आपल्याला त्या जिनसा पाह्यच्या आहेत का ? "

माणिकलालनें शक्य तेवढ्या ओबड धोबड जिनसा निवडून आणून त्या आधीं पुढें पाठवल्या होत्या. कुठल्याही बेगमेनें त्या पसंत करूं नयेत अशीच त्याची योजना होती. पहारेवालीनें बेगमला ज्यावेळीं ही वर्दी दिली त्यावेळीं निर्मलकुमारी बेगमच्या शेजारींच होती. तिनें डोळ्यानें खूण केली तेव्हां जोधपुरी बेगमनें म्हटलें, " हो. मला एकदां त्या जिनसा पाहून घेऊं देत. "

आदल्या दिवशीं रात्रीं बादशहाची आणि निर्मलकुमारीची भेट घडली त्यावेळीं त्या दोघांत जें संभाषण झालें त्याचा तपशिलवार अहवाल निर्मलकुमारीनें जोधपुरी बेगमला सांगितला होता. तो ऐकून जोधपुरी बेगम निर्मलकुमारीवर बेहाय खुष झाली होती. तिनें तोंड भरून तिची स्तुति केली आणि तिला अनेक

आशिर्वाद दिले. तेव्हांपासून निर्मलकुमारीवर जोधपुरी बेगमेचा पूर्ण विश्वास बसला होता, म्हणूनच तिनें केलेली खूण ध्यानांत घेऊन बेगमेनें ते जिन्नस आणण्याचा हुकूम दिला.

पहारेवाली निघून गेली तेव्हां निर्मलकुमारीनें माणिकलालनें केलेल्या संकेताची सारी हकिकत जोधपुरी बेगमेला थोडक्यांत सांगितली. ती ऐकून जोधपुरी म्हणाली, "तर मग असं कर, मी ते जिन्नस पसंत करण्यासाठीं बराचसा वेळ काढतें. तोंपर्यंत तूं आपल्या नवऱ्याला सर्व हकिकतीचं एक पत्र लिहून ठेव. तुझा पत्ता त्याला द्यायला हीच योग्य संधी आहे."

कोणत्याही पुरुषाला अन्तःपुरांत येण्याची परवानगी नसे, अर्थात् माणिकलालनें आणलेल्या साऱ्या संगमरवरी जिनसा दासीनें आणून बेगमेसमोर हजर केल्या. त्या सर्व जिनसांवर माणिकलालनें आधीं दाखवून दिल्याप्रमाणें खूण होती असें निर्मलकुमारीला दिसून आलें. तशी खात्री करून घेतल्यावर निर्मल पत्रें लिहायला बसली. निर्मलचें पत्र लिहून होईपर्यंत जोधपुरी बेगम त्या जिनसा पुन्हां पुन्हां पारखून पाहण्यांत वेळ काढत होती. त्या जिनसांत एक संगमरवरी पेटी होती. तिच्यावर मूल्यवान् हिरेमाणकांचें कोंदण केलेलें होतें. त्या पेटीचें कुलुप बंद करण्यासाठीं एका सोनेरी सांखळीला चावी अडकवून ठेवलेली होती. निर्मलचें पत्र लिहून झाल्यावर जोधपुरी बेगमेनें कुणाच्याही लक्षांत न येईल अशा प्रकारें तें पत्र त्या पेटींत टाकून चावी लावून ती पेटी बंद केली.

जोधपुरी बेगमेनें साऱ्या वस्तू पसंत करून ठेवून घेतल्या. फक्त तेवढी रत्नजडीत पेटी नापसंत करून परत दिली. ती पेटी परत करतांना तिनें बुद्धिपुरःसर त्या पेटीची चावी परत केली नाहीं.

वेषांतर करून आलेला सौदागर माणिकलालच होता. नुसती पेटी परत आली, तिची चावी परत आली नाहीं हें पाहून त्याला आशा उत्पन्न झाली. जोधपुरी बेगमेनें विकत घेतलेल्या जिनसांचे दरदाम ठरवून, मिळालेली रक्कम घेऊन ती पेटी घेऊन तो आपल्या दुकानांत गेला.

एकांतांत जाऊन त्यानें ती पेटी उघडून पाहिली त्यावेळीं त्यांत त्याला निर्मलकुमारीचें पत्र सांपडलें.

त्या पत्रांत निर्मलकुमारीनें काय लिहिलें होतें तें इथें सांगण्याचें प्रयोजन नाहीं. सर्वसाधारणपणें झालेली हकीकत तिनें लिहिली होती. त्या अनुषंगानें तिनें इतर जें कांहीं लिहिलें होतें पुढें आपोआप कळेलच.

निर्मलचें पत्र मिळाल्यामुळें माणिकलाल निश्चित झाला. तो स्वदेशीं जायच्या उद्योगाला लागला. त्याच दिवशीं दुकान बंद करून निघून गेल्यास संशय घेतला जाईल अशा आशंकेनें त्यानें खरेदी विक्री करीत दिल्लींतच आणखी कांहीं दिवस घालवायचे असें ठरवलें.

## : ७ :

● **रूपनगरहून** पराभव घेऊन जे जे लढवय्ये परत आले होते त्यापैकी कित्येकांना औरंगजेबानें पदच्युत केलें तर कित्येकांना शिक्षाही केल्या. मात्र मुबारकची गणना या लोकांत करण्यांत आली नव्हती. त्याच्या वीरत्वाची कहाणी सर्वांच्याच तोंडून ऐकल्यामुळें औरंगजेबानें त्याला बहाल राखलें होतें.

ती मुबारकची प्रख्याति जेबुन्निसेच्याही कानीं आली होती. मुबारक आपणहून आपल्यापाशीं येईल आणि झालेली सर्व हकिकत आपल्याला सांगेल असें तिला वाटत होतें, पण मुबारक आला नाहीं.

दर्याबिबीला घेऊन मुबारक आपल्या घरीं आला होता. तिथें खोजे आणि दासी तिच्या तैनातीला देऊन तिला आदरानें वागवायला त्यानें सुरवात केली होती. तिच्या दर्जाला शोभेल असा पोशाख आणि कपडे देऊन त्यानें तिला सजवलें होतें. यथासाध्य दागदागिनेही तिला दिले होते. मुबारकनें शास्त्रविधीनें पाणिग्रहण केलेल्या पत्नीचा दर्जा देऊन तिच्यावर घरसंसाराचा भार टाकला होता.

मुबारक आपखुषीनें येत नाहीं असें पाहून जेबुन्निसेनें त्याला बोलावण्यासाठीं आपला विश्वासू खोजा आसीरउद्दिन याला त्याच्याकडे पाठवलें, तरीही मुबारक आला नाहीं. जेबुन्निसेला फार राग आला. एवढी कसली हिमाकत ! मेहेरबानी फर्मावून बादशहाजादी याद करते आहे तरीही हा नफर हाजिर होत नाहीं म्हणजे काय ? केवढी ही गोस्ताकी !

कांहीं दिवसपर्यंत जेबुन्निसा तशीच रागानें फणफणत राहिली होती. तिला वाटत होतें, कीं आपल्या लेखीं सारेच सारखे आहेत. अशा रितीनें मुबारकला

धुडकावण्याचा प्रयत्न केला तरीही ती हें विसरली होती, कीं खुदानें बादशहाजादी असो कीं शेतकऱ्याची बेटी असो, दोघांनाही एकाच सांचानें घडविलेलें आहे. धनदौलत, तख्त-ए-ताऊस, हे नुसते कर्मभोग मात्र—मनोरचनेच्या दृष्टीनें साऱ्या बायका तेवढ्या सारख्याच—पण ती बादशहाजादी होती ना !

व्यवहाराच्या दृष्टीनें पाहूं गेलें तर सारींच माणसें कांहीं सारखीं नव्हेत. जेबुन्निसाही कांहीं सर्वासारखीच नव्हती. कांहीं दिवस रागारागानें मनाला आळा घातला तरीही मुबारकच्या भेटीसाठीं ती अंतरांतून तळमळत होती.

तिनें आपला अभिमान—शहाजादीचा अभिमान—नायिकेचा अभिमान—दोन्हीही क्षणभर बाजूला ठेवले आणि मुबारकला तिनें पुन्हां एकदां बोलावणें पाठवलें. मुबारक म्हणाला, “ माझी बहोत बहोत तस्लीमात ! शहाजादीपेक्षां माझ्या लेखीं या उभ्या दुनियेंत बेश किस्मत दुसरें कांहींही नाहीं. एकच आहे मात्र—खुदा आहे—दीन आहे. माझ्या हातून यापुढें गुन्हेगारी व्हायची नाहीं. यापुढें मी महालांत पाऊल ठेवणार नाहीं. मी आतां दर्याला घरीं आणली आहे. ”

मुबारकचें हें उत्तर ऐकून जेबुन्निसा ज्वालामुखीसारखी भडकली. मुबारक आणि दर्या या दोघांचाही सत्यानाश करायची तिनें प्रतिज्ञा केली. तो होता बादशाही दस्तुर !

यावेळीं महालांत निर्मलकुमारी राहिलेली असल्यामुळें जेबुन्निसाचा हा उद्देश सिद्ध होण्याची सोय झाली होती. निर्मलकुमारीचा जसजसा परिचय होत होता तसतशी औरंगजेबाची मर्जी तिच्यावर अधिक अधिक बसली जात होती —म्हणजे तिथें मदनदेवाच्या भानगडीची कांहीं कारवाई नव्हती—तें काम होतें सैतानाच्या साम्राज्याचें.

जेव्हां जेव्हां औरंगजेबाला फुरसत असे तेव्हां तेव्हां शिळोप्याच्या गोष्टी करण्यासाठीं तो रूपनगरच्या नाजनीला बोलावून घेत असे. कितीतरी वेळ तिच्याबरोबर गप्पागोष्टी करीत असे. राजसिंहाच्या राजकीय परिस्थितीचा अंदाज काढावा, हाच या गप्पागोष्टी करण्यांत उद्देश होता. औरंगजेब म्हणजे एक चतुर मुत्सद्दी होता. युद्धाचा प्रसंग आला तर त्यावेळीं उपयुक्त होतील अशा बातम्या काढून घेण्यासाठीं आपला हा प्रयत्न चालला आहे हें तो सहसा कुणाही ऐकणाराला कळूं देत नव्हता. निर्मलकुमारी देखील कांहीं कमी चतुर

नव्हती. औरंगजेबाच्या तोडीला तोड देण्याइतकी कुशलता तिच्याही ठायीं होती. औरंगजेबाचा उद्देश ध्यानीं घेऊन ती त्याच्या प्रश्नांना बेछूट खोटीं उत्तरें देत होती.

अर्थात्, औरंगजेबही तिच्या या उत्तरांवर पूर्णपणें संतुष्ट होत नव्हता. तो मनांतल्या मनांत असें म्हणे,—' माझ्या सैन्यसागरांत मी सारा मेवाड बुडवून टाकीन यांत मुळींच संदेह नाहीं. राजसिंहाच्या राज्याचा मागमूसही राहणार नाहीं खरा, पण त्यामुळें माझा मान कांहीं टिकून राहणार नाहीं. माझ्या झालेल्या अपमानाची भरपाई करून घ्यायची म्हणजे रूपनगरच्या राणीला छिनावून आणली पाहिजे. मेवाडचं राज्य मिळालं म्हणजे कांहीं तिथली राजराणी मिळेलच असं म्हणतां यायचं नाहीं. या रजपूताच्या बेट्या, सहज बोलतां बोलतां पेटत्या चितेंत उडी घेऊन स्वतःला जाळून घेतात, बोलतां बोलतां विषप्राशन करतात. माझ्या हातीं पडायच्या पूर्वी ही सैतानी खास प्राणत्याग करील, पण या आतां हातीं मिळालेल्या दासीला हस्तगत केली, आपलीशी करून घेतली, तर हिच्याकरवीं त्या राणीलाही भूलथाप देऊन आणतां यायचं नाहीं का ? ही बाँदी वशीभूत नाहीं का व्हायची ? एवढा मोठा दिल्लीचा बादशहा मी, या एकट्या सामान्य बाँदीला आपलीशी करून घेतां यायचं नाहीं का मला ? तसं नाहीं करतां आलं तर माझी एवढी ही बादशाही ना मुनासीन होईल.'

तेवढ्यासाठींच बादशहानें जेबुन्निसेला याकामीं हाताशीं घेतलें होतें. ती निर्मलकुमारीच्या अंगावर वेळोवेळीं मोलवान् दागिने चढवी, तिला बहुमोल पोशाख देई. कोणत्याही बेगमेच्या तोडीची ती दिसावी अशी व्यवस्था करी. त्या महालांत निर्मलचा शब्द खालीं पडत नसे. ती जें मागे तें तिला मिळे. मात्र तिला बाहेर जायला मिळत नव्हतें.

या सर्व बाबतींत जोधपुरी बेगम आणि निर्मल यांच्यांत वारंवार चर्चा होत असे. दोघीही ही चर्चा करतांना पुढील कार्यावर लक्ष ठेवून कशा रितीनें वागावें याचा आढावा घेत होत्या.

जेबुन्निसा म्हणजे औरंगजेबाचा उजवा हात. औरंगजेबाचा हुकूम होतांच निर्मलकुमारीला बगलेला मारायला तिनें सुरवात केली. स्वतः औरंगजेब निर्मलशीं नुसत्या गोड गोड गोष्टी बोलत राहिला होता. तेवढेंच काम आपल्या हातीं ठेवून अस्सल कामाचा भार त्यानें शाहजादीकडे सोंपविला होता.

औरंगजेब निर्मलबरोबर थट्टामस्करी करीत असे, पण तीही एक प्रकारें घासून पुसून केलेल्या बादशाही थाटांत. त्यानें कांहीं म्हटलें तरी निर्मलला राग धरतां येत नसे. ती जीं उत्तरें त्याला देई तीही एक प्रकारें घासून पुसून बायकी थाटाचीं असत. मात्र त्यांत रुपनगरच्या पहाडी थाटाचा कठोरपणा असे. या त्यांच्या शिळोप्याच्या गप्पा कशा प्रकारें चालत असत तें लिहून ठेवणें सदभिरुचिला साजेसें होणार नाहीं म्हणून बादशाही रुचीचीं तीं उदाहरणें इथें न दिलेलींच बरीं.

निर्मलच्यासमोर ज्या गोष्टी जेबुन्निसा तिच्याशीं मोकळेपणानें बोले, अशा वेळीं केव्हां केव्हां इतर गोष्टीबरोबर रुपनगरची लढाई कशा प्रकारें झाली तें शहाजादी तिला विचारीत असे. या लढाईचा सुरवातीचा भाग निर्मलला पाहतां आला नव्हता, पण चंचलकुमारीच्या तोंडून तिनें जो सर्व इतिहास ऐकला होता, तो जसाच्या तसा तिनें जेबुन्निसला सुनावला. चंचलकुमारीच्या समोर पराभव स्वीकार करून लढाईत यश मिळवायच्याऐवजीं मुबारकनें मोगल सैन्याला माघार घ्यायला लावल्याची हकिकत तिनें शहाजादीला सांगितली. रजपूत सैनिकांचा बचाव व्हावा म्हणून चंचलकुमारी स्वेच्छेनें दिल्लीला यायला निघाली होती, वाटेंत विष खाऊन जीव द्यायची तयारी तिनें ठेवली होती, तीही हकिकत तिनें सांगितली—चंचलकुमारी अशा प्रकारें दिल्लीला यायला तयार झाली असतांही मुबारकनें तिला बरोबर आणलें नाहीं हेंही तिनें शहाजादीला सांगितलें.

ही हकिकत जेबुन्निसेनें ज्यावेळीं ऐकली, त्यावेळीं ती आपल्याशींच म्हणाली, ' मुबारकसाहेब ! याच शस्त्रानं तुझं शीर मी धडापासून वेगळं करीन ! '

योग्य संधि पाहून जेबुन्निसेनें रुपनगरच्या लढाईचा तो इतिहास औरंगजेबाच्या कानीं घातला. तो घातकी औरंगजेब म्हणाला, " हा नफर जर असा विश्वासघातकी असेल तर आजच्या आज त्याला जहान्नममध्यें पाठवीन. "

जेबुन्निसाच्या या चुगलीच्या मागची भूमिका औरंगजेबाला माहित नव्हती असें नाहीं. तिच्या दुर्वर्तनाच्या हकिकती त्याच्या कानावर येत असत. अशी एक म्हण आहे ' कीं, हंडीला कुत्रा शिवला तर तो माणूस कुत्र्याला मारील, पण हंडी फेंकून देणार नाहीं. ' अशा वृत्तीचे लोक या देशांत आहेत. मोगल

बादशहा बहुधा सारे याच संप्रदायाचे लोक होते. त्यांची मुलगी किंवा बहिण बदचालीची निघाल्याचें त्यांना कळलें तर त्या मुलीला किंवा बहिणीला ते कांहीं बोलत नसत, पण ज्या व्यक्तीशीं त्या मुलीबहिणींचा संबंध येईल त्याचा पत्ता लागतांच त्याच्यावर कसलें ना कसलें कुभांड घालून युक्तीनें तो कांटा काढीत.

मुबारक हा जेबुन्निसेच्या प्रीतीला प्राप्त झाल्याबद्दल औरंगजेबाला बरेच दिवसापासून संशय येत होता, पण या वेळेपर्यंत त्याला नीटशी कल्पना आली नव्हती. आतां तिच्या या भाषणावरून त्याला नीट कळून आलें, कीं त्या दोघांत आतां वितुष्ट आलें आहे आणि जी मुंगी आपल्याला डसली तिला चिरडून मारायला ती आतां प्रवृत्त झाली आहे. औरंगजेबाला देखील ती गोष्ट संमत होती, पण खुद्द निर्मलच्या तोंडून ती हकिकत सविस्तर ऐकून घ्यायची असें ठरवून त्यानें निर्मलला बोलावून घेतलें. यांतला अंतस्थ प्रकार काय होता हें निर्मलला माहित नव्हतें कीं जाणवलेंही नव्हतें. तिनें सर्व हकिकत औरंगजेबाला तपशिलवार सांगितली.

त्यानंतर औरंगजेबानें बक्षीला बोलावून घेतलें आणि मुबारकच्या बाबतींत काय करायचें तो हुकूम दिला. बक्षीनें बादशहाच्या हुकुमाप्रमाणें आठ शिपाई मुबारकला पकडून आणण्यासाठीं पाठवले. ते मुबारकला घेऊन आले त्यावेळीं तो हंसत हंसतच येऊन बक्षीसमोर हजर झाला. त्याजागीं दोन लोखंडी पिंजरे ठेवलेले होते. त्या प्रत्येकांत एक एक विषारी साप फूत्कार टाकीत वळवळत होता.

आज कुणाही गुन्हेगाराला प्राणदंडाची शिक्षा दिली तर त्याला फांशीं देण्यांत येतें. त्याखेरीज दुसरा कोणताही प्रकार आज प्रचलित नाहीं. मोंगलांच्या राज्यांत माणसाचा जीव घ्यायचे अनेक प्रकार प्रचलित होते. कुणाचा शिरच्छेद केला जाई, कुणाला सुळावर चढवण्यांत येई, कुणाला हत्तीच्या पायाखालीं टाकण्यांत येई, तर कुणाला विषारी साप सोडून त्याच्या दंशानें मारण्यांत येई. ज्याचा गुपचुप जीव घ्यायचा असेल अशा माणसाला विषप्रयोग करण्यांत येत असे.

मुबारक हंसतमुखानें पुढें आला आणि त्यानें त्या दोन्ही पिंजऱ्याकडे एकदा

नजर फेंकली. तो तसाच हंसत हंसत म्हणाला, " काय ! आमची रवानगी व्हायची आहे वाटतं ! "

बक्षी खिन्नपणें म्हणाला, " बादशहाचा हुकुम ! "

मुबारकनें विचारलें, " बादशहानं हा हुकुम कां सोडला याची कांहीं कल्पना आहे का तुम्हाला ? "

बक्षी म्हणाला, " नाहीं. तुम्हाला नाहीं का माहित ? "

" थोडासा अंदाज आला आहे मला. " मुबारक म्हणाला, " आतां उशीर कशाला लावायचा ? "

बक्षी म्हणाला, " होऊन जाऊं दे. "

मुबारकनें आपल्या पायांतलें पादत्राण काढलें आणि एका पिंजऱ्यावर त्यानें आपला पाय ठेवला. आंतला साप फूत्कार करीत वर आला आणि त्यानें पिंजऱ्याच्या छिद्रांतून त्याला दंश केला.

दंश होतांच मुबारकनें थोडेसें तोंड वाकडें केलें. तो बक्षीला म्हणाला, " बक्षी-साहेब, मुबारक कां मेला असं जर कुणी तुम्हाला विचारलं तर मेहरबानी करून त्याला सांगा, कीं शहाजादीअलम जेबुन्निसा बेगमसाहेबाच्या इच्छेनं ! "

बक्षी घाबरला. काकुळतीला येऊन म्हणाला, " चूप ! चूप ! असं कांहीं बोलूं नका. "

एका सापाच्या दंशांत पुरेसें विष नसलें तर दुसरा साप तयार ठेवला जात असे तो त्यानें दंश करावा म्हणून. मुबारकला तें माहित होतें. त्यानें दुसऱ्या सापाच्या पिंजऱ्यावर पाय ठेवला. त्या दुसऱ्या महासर्पानें त्याला जोरानें दंश केला.

मुबारकला विष चढूं लागलें. तो काळानिळा झाला. पाहतां पाहतां थकत आला. तो गुडघे टेकून जमिनीवर बसला आणि दोन्ही हात जोडून म्हणाला, " अल्ला हो अकबर ! तुझ्या दयेला पात्र व्हावं असं कोणतंही काम माझ्या आयुष्यांत मी कधीं केलं असेल तर यावेळीं माझ्यावर दया कर. "

तो ईश्वराची करुणा भाकीत होता. त्या सर्पाच्या तीव्र विषानें बर्बर होऊन मोगलवीर मुबारक अल्ली हा लोक सोडून गेला.

: ८ :

**रंगमहालांत** सगळीकडच्या बातम्या येत असत. जेबुन्निसा सर्व प्रकारच्या बातम्या मिळवण्यासाठीं तत्पर असे. ती नायब बादशहा होती. मुबारकच्या वधाची बातमीही तिच्यापर्यंत येऊन पोंचली.

सुडाच्या भावनेनें ती या कार्याला प्रवृत्त झाली होती. ती बातमी ऐकतांच आपल्याला आनंद होईल अशी पूर्वी तिची अपेक्षा होती पण त्याच्या अगदीं उलट झालें. ती बातमी ऐकतांच तिच्या डोळयांत टचकन पाणी आलें. हा खडक यापूर्वी कधीं पाझरला नव्हता. आंसवांच्या सारख्या धारा लागलेल्या होत्या. तिच्या हृदयांत भयंकर तुफान उठलें होतें. एकदम टाहो फोडून रडायला सुरवात करावी असें तिला वाटत होतें.

जेबुन्निसानें दार बंद करून घेतलें आणि रत्नखचित असलेल्या हस्तीदंती पलंगावर अंग टाकून देऊन ती ओक्साबोक्शी रडूं लागली.

कुठें गेला तो शहाजादीचा दिमाख ! रत्नखचित हस्तिदंती पलंगावर अंग टाकलें तरी कांहीं डोळयांतली आंसवें आटत नाहींत ! दिल्ली शहरांतल्या कोना-कोपऱ्यांत जा, एकाद्या पडक्या झोंपडींत प्रवेश करा, तिथें फाटक्या वाकळीवर बसून कित्येक लोक आनंदानें उसळून हंसत असतील. असे रडत नसतील या शहाजादीसारखे.

आपल्याच हातानें आपण आपल्या पायावर कुऱ्हाड मारून घेतली असें तिला वाटलें, आपल्या सुखांत आपणच विष कालवलें. हळूहळूं तिला वाटूं लागलें कीं बादशहाजादीच्या हृदयांत देखील प्रेमाची ज्योत जागी असते. कळून असो कीं नकळून असो, स्त्रीचा देह धारण केला कीं हृदयांत या भावनेला आसरा दिल्याखेरीज गत्यंतर नसतें. ती आपल्या अन्तरंगाचा ठाव घेऊं लागली. ती आपल्याशींच म्हणाली, " माझं त्याच्यावर एवढं प्रेम होतं हें इतक्या दिवसांत मला कसं नाहीं जाणवलं ? "

ऐश्वर्यमदानें तूं धुंद झालीस, सौंदर्याच्या गर्वानें तूं अंध झालीस, इंद्रियाची दासी होऊन तू प्रेमाला ओळखलें नाहींस, तुला योग्य शिक्षा झाली, कुणीसुद्धां तुझी दया करूं नये, असें तिला सांगायला कुणी अधिकारी व्यक्ति तिथें नव्हती.

कुणी सांगो वा न सांगो, या सर्व भावना त्यावेळीं तिच्या अंतरंगांत जाग्या होऊन तिला डिवचूं लागल्या होत्या. धर्माधर्माची कल्पना त्याचवेळीं तिला आठवूं लागली होती. आपल्या हातून हा अधर्म झाला आहे याची तिला जाणीव झाली. या अधर्माबद्दल आपल्याला शिक्षा तर होणार नाहीं ना, असें मनांत येऊन ती घाबरली. केलेल्या पापाबद्दल शिक्षा देणारा कुणी आहे का कुठें ! जेबुन्निसा बादशहाजादी आहे म्हणून तो तिला क्षमा करील का ?

तिला वाटलें, नाहीं. तिचा थरकांप उडाला.

तिच्या दुःखाची परमावधि झाली होती, शोकानें ती व्याकूळ झाली होती, तशीच घाबरलीही होती. तिनें दार उघडलें आणि आपला विश्वासू खोजा अमीरउद्दिन याला तिनें बोलावून घेतलें. तिनें त्याला विचारलें, " सापाच्या विषानं माणूस मेला तर त्यावर कांहीं उपाय आहे का ? "

" मेल्यावर कसला आला आहे उपाय ? " असीरउद्दिन म्हणाला.

" कधींच असं कांहीं ऐकलं नाहींस का ? "

" हातिममालनं असं कांही केलं होतं म्हणून मी ऐकलं होतं—पण डोळ्यानं पाहिलं नाहीं. "

जेबुन्निसेला थोडा धीर आला. ती म्हणाली. " तूं हातिममालला ओळखतोस ? कुठं रहातो तो ? "

" तो दिल्लींतच रहातो. "

" त्याचं घर तुला ठाऊक आहे ?

" आहे. "

" आत्तांच जाशील का त्याच्याकडे ? "

" हुकुम झाला तर जाईन. "

" आज मुबारकअल्ली सर्पदंशानं मेल्याचं कळलं ना तुला ?—" बोलत असतांना तिचा गळा दाटून आला होता. तो ' होय ' म्हणाला तेव्हां तिनें विचारलें, " त्याला कुठं कबर दिली तें माहित आहे का तुला ? "

" मी कांहीं पाहिलं नाहीं. " असीरउद्दिन म्हणाला, " पण कबरस्तानांतच कुठंतरी कबर दिलेली असणार. ताजीच कबर असल्यामुळें सहज ओळखून काढतां येईल. "

जेबुन्निसा म्हणाली, " मी तुला दोनशें अश्रफी देतें. शंभर हतीममालला दे आणि शंभर तूं घे. मुबारकअल्लीची कबर खोलून मुडदा बाहेर काढून त्याला कांहीं उपाय करायला सांग. जर तो वांचला तर त्याला माझ्यापाशीं घेऊन ये. आतां लवकर जा पाहूं. "

अश्रफी घेऊन खोजा असीरउद्दिन लगेच तेथून बाहेर पडला.

: ९ :

पुन्हां एकदां माणिकलाल संगमरवरी जिनसा विकण्यासाठीं रंगमहालांत आला. तिथें कांहीं जिन्नस विकल्यावर त्यानें निर्मलकुमारीची खबर घेतली. याहीवेळीं त्यानें संगमरवरी पेटी कुलुप लावून आणली होती ती निर्मलकुमारीच्या हातीं गेली त्यावेळीं तिनें आपल्याकडील चावी लावून ती उघडली. त्यांत तें बातमीवाहू कबूतर होतें. निर्मलनें तें कबूतर ठेवून घेतलें आणि पूर्वीप्रमाणेंच आपण लिहिलेलें पत्र त्या पेटींत ठेवून दिलें. तिनें त्या पत्रांत लिहिलें होतें :—

' सर्व ठीक आहे. आतां तुम्ही जा. पूर्वीं मी कळविलें होतें त्याप्रमाणें मी बादशहाच्या बरोबर येईन. '

माणिकलालनें दिल्लीचें दुकान बंद केलें आणि तो उदयपुरला जायला निघाला. पहाट व्हायला थोडासा अवधि असतांनाच तो निघाला होता. दिल्लीला अनेक दरवाजे आहेत, पण पुढें कुणीतरी संशय घेईल म्हणून अजमीर दरवाज्यानें न जातां तो दुसऱ्याच एका दरवाज़ानें निघाला.

वाटेंत त्याला एक कबरस्थान लागलें. तिथल्या एका कबरीपाशीं दोघेजण उभे होते. माणिकलाल आणि त्याचे सोबती येत असलेले पाहतांच ते दोघेही धूम ठोकून पळाले. माणिकलाल घोड्यावरून खालीं उतरला आणि त्या कबरीपाशीं जाऊन पहातो तों त्याला दिसून आलें, कीं कुणीतरी ती कबर खणून काढून आंतला मुडदा बाहेर काढून ठेवला होता.

नुकतांच सूर्य उगवूं लागला होता. त्या अंधुक प्रकाशांत माणिकलालनें तो मुडदा नीट न्याहाळून पाहिला. त्यानें तो मुडदा कपड्यांत गुंडाळून बांधून घोड्यावर टाकला आणि आपण पायीं चालायला सुरवात केली.

माणिकलाल दिल्ली दरवाजाच्या बाहेर जाऊन पोंचला. त्यावेळीं सूर्योदय

झाला होता. माणिकलालनें तो मुडदा घोड्यावरून खालीं उतरून घेतला आणि जंगलाच्या छायेंत नेऊन ठेवला. त्यानें आपल्या पेटाऱ्यांतून एक औषधाची वडी बाहेर काढली आणि ती कसल्या तरी अनुपानांत तयार केली. एक सुरी घेऊन त्यानें त्या मुडद्याच्या अंगावर ठिकठिकाणीं चिरून पाहिलें आणि त्यांत तें औषध चोळून घातलें. तसेंच थोडेसें जिभेला चोळलें आणि थोडें डोळ्यांतही घातलें. घटकाभर वाट पाहून त्यानें पुन्हां त्या औषधाचा तसाच प्रयोग केला.

अशा प्रकारें तीन वेळ औषधाचा प्रयोग केल्यानंतर त्या मेलेल्या व्यक्तीनें एक मोटा सुस्कारा सोडला. चौथ्या वेळीं औषध दिल्यावर त्यानें डोळे उघडले आणि तो शुद्धीवर आला. पांचव्या वेळच्या औषधानें तो उठून बसून बोलूं लागला.

मधल्या वेळांत माणिकलालनें जवळपास जाऊन थोडें दूध मिळवून आणलें होतें. तें त्यानें मुबारकला पाजलें. दूध पोटांत जातांच मुबारकला चांगलें बोलण्याइतकी ताकद आली. गत गोष्टींची त्याला आठवण झाली. त्यानें माणिकलालला विचारलें, " कुणी मला वांचवलं ? आपणच का ? "

माणिकलालनें होकार दिला.

मुबारक म्हणाला, " मला कां वाचवलं ? मी तुम्हांला ओळखलं. रूपनगरच्या पहाडांत तुमचे माझे लढाईत दोन हात झाले होते. मी त्यावेळीं तुमच्या हातून पराजित झालों होतों. "

माणिकलाल म्हणाला, " मीही तुम्हाला ओळखलं. महाराण्याचा पराभव केला तो तुम्ही. आपली ही अशी दशा कां झाली ? "

मुबारक म्हणाला, " तें यावेळीं सांगणं बरं नव्हे. पुन्हां केव्हांतरी सांगेन. तुम्ही कुठं जातांहां ? उदयपुरला का ? " माणिकलाल ' हो ' म्हणाला, त्यावेळीं त्यानें विचारलें, " मलाही बरोबर नेतां का ? तुम्हाला बहुधा कल्पना आली असेल, कीं आतां मला फिरून दिल्लींत जाणं शक्य नाहीं. बादशहानं मला ही शिक्षा दिली होती. "

माणिकलाल म्हणाला, " मी तुम्हाला माझ्याबरोबर घेऊन जाईन, पण यावेळीं प्रवास करण्याइतकी ताकद तुमच्या अंगीं नाहीं. "

मुबारक म्हणाला, " संध्याकाळपर्यंत मी बराचसा ताजातवाना होईन, तोंपर्यंत थांबायला तुम्हाला सवड आहे का ? "

माणिकलालनें त्याला कबुली दिली. त्यानें आणखी दूध आणि खाण्याचे पदार्थ मिळवून ते मुबारकला खायला घातले. गांवांतून त्यानें एक तट्टू विकत आणला. मुबारकला त्या तट्टावर बसवून ते सारे उदयपुरच्या वाटेनें निघाले.

वाट चालत असतांना मुबारकनें माणिकलालला सारी हकिकत तपशिलवार सांगितली. जेबुन्निसेच्या क्रोधानिमित्त मुबारकची आहुति दिली गेली हें माणिकलालला आतां कळून चुकलें.

इकडे असीरउद्दिन जेबुन्निसेपाशीं आला आणि त्यानें तिला सांगितलें, कीं कोणत्याही उपायानें मुबारकला पुन्हां वांचवतां आलें नाहीं. तें ऐकून अत्तरानें माखलेला रूमाल डोळ्यांना लावून ती रडूं लागली. धरणीवर अंग टाकून एकाद्या गांवढळ बाईप्रमाणें ती डोकें आपटून घेऊं लागली.

तें दुःख तिला कुणापाशींही उघड करून सांगून हृदयावरचा भार हलका करतां येणें अशक्य झालें होतें, त्याचप्रमाणें तें सहन करणेंही तिला कठिण जात होतें. हा कोंडमारा तिला असह्य झाला होता. तिला वाटलें, मी एकादी सामान्य शेतकऱ्याची मुलगी असतें तर किती बरें झालें असतें?

त्याचवेळीं त्या खोलीच्या बाहेर कसला तरी गलगा झाला होता. कुणीतरी आंत येण्यासाठीं जिद्द करीत होतें पण पहारेकरी त्या व्यक्तिला आंत येऊं देत नव्हता. आवाजावरून जेबुन्निसेला ती दर्या असावीसें वाटलें. पहारेकऱ्याला धडक मारून ती आंत आली. तिच्या हातांत तलवार होती. जेबुन्निसेवर वार करण्यासाठीं तिनें तलवार उचलली. पण तितक्यांत हातची तलवार फेंकून देऊन ती जेबुन्निसेसमोर नाचूं लागली. जेबुन्निसेला पाहून ती म्हणाली, "बहोत अच्छा! रडते आहेस? बहोत अच्छा!"

ती मोठमोठ्यानें हसूं लागली. जेबुन्निसेनें शिपायाला बोलवून तिला पकडून धरायला सांगितलें, पण ती त्याच्या हातीं सांपडली नाहीं. तिनें एकदम धूम ठोकली. ती पळते आहे असें पाहून शिपाईही तिच्या मागोमाग धांवला. त्यानें तिचें वस्त्र पकडलें पण तें तसेंच फेंकून देऊन ती तशीच धांवत सुटली.

दर्या वेडी झाली होती—उन्मत्त झाली होती.

मुबारकच्या मृत्युची बातमी आतां तिला कळली होती.

❦

# सप्तम खंड

## : १ :

राजसिंहाच्या राज्याचा विध्वंस करण्यासाठीं औरंगजेबानें स्वारी करण्याचें ठरवलें. या स्वारीला विलंब लागत होता, कारण त्यानें सैन्याची जमवाजमव प्रचंड प्रमाणांत करायला सुरवात केली होती. भारती-युद्धाच्यावेळीं दुर्योधन आणि युधिष्ठिर यानीं ज्याप्रमाणें चौंहीकडचे सैनिक गोळा केले होते त्याचप्रमाणें ब्रह्मपुत्र पार होऊन बाल्हिकपर्यंत, काश्मिरपासून केरळ आणि पाड्यपर्यंत, जिथें जेवढें सैन्य होतें तेवढें सारें या महायुद्धासाठीं त्यानें बोलावून घेतलें होतें. दक्षिणेकडचे महासैन्य गोवळकोंडा, विजापूर आणि महाराष्ट्रांतल्या लढाईच्या अविश्रांत वज्राघातानें चीत झाले होते तरी लढत होते. वृत्रासुराप्रमाणें इंद्राच्या वज्रालाही दुर्भेद्य होणारें तें सैन्य घेऊन बादशहाचा वडिल मुलगा शहाअलम दक्षिणेंतून उदयपुरच्या लढाईसाठीं आला होता. दुसरा मुलगा, बंगालचा राजप्रतिनिधी अझमशहा पूर्व भारतातील जबरदस्त सैन्य घेऊन मेवाडच्या पर्वतमालेच्या दाराशीं हजर झाला होता. पश्चिमेकडून मुलतान ते पंजाब आणि काबूल काश्मिरकडचा महापराक्रमी सेनासमूह घेऊन दुसरा मुलगा अकबरशहा या सर्व सैन्यांत सामील झाला होता. स्वतः शहानशहा औरंगजेब दिल्लींतून आपली अपराजेय बादशाही सेना घेऊन उदयपुरचें नांव जगांतून नाहींसे करून टाकण्याकरितां मेवाडांत हजर झाला होता. महासमुद्रांत एकादें पर्वतशिखर दिसावें त्याप्रमाणें या मोगल सेनेच्या अफाट सागरांत उदयपुर विराजमान झालें होतें.

अनंत सर्पांच्या समुदायाला पाहून गरुडाला जें वाटेल तेंच ही मोगलसेना पाहून राजसिंहाला वाटत होतें. भारतीय युद्धाच्या काळांत कुरुक्षेत्रीं जमा

ालेल्या सेनेनंतर एवढी सेना कधींच एकत्र झाली नव्हती. राजपुतान्यांतल्या
का लहानशा भूमीखंडावर चाल करून जाण्यासाठीं औरंगजेबानें यावेळीं
ापली सर्व शक्ति खर्ची घातल्याचें पाहून राजसिंहाला मोठें कौतुक वाटलें.

युद्धविद्या ही युरोपीय विद्या आहे. आशिया खंडांत आणि भारतवर्षांत
ोणत्याच काळांत या विद्येचा विकास झालेला नाहीं. पुराण आणि इतिहासांत
र्णन केलेली आर्य वीरांची जी ख्याति आहे ती केवळ त्यांची तिरंदाजी आणि
ाठी बहाद्दुरीपुरतीच. इतिहासलेखक ब्राह्मणांना युद्धविद्या म्हणजे काय
कळत नव्हतें म्हणून असो, कीं प्राचीन कालांत भारतवर्षांत युद्धविद्या
ळीं नव्हतीच म्हणून असो, रामचंद्र आणि अर्जुन वगैरेंच्या सेनापतीत्वाबद्दलचा
ोणताही पुरावा सांपडत नाहीं. अशोक, चंद्रगुप्त, विक्रमादित्य, शकादित्य,
ालादित्य यांच्यापैकीं कुणाच्याही सेनापतीत्वाचा कसलाच पुरावा सांपडत
ाहीं. ज्यांनीं भारतवर्षावर विजय मिळवला त्या महंमद कासीम, गझनी
हंमद, शहाबुद्दीन, अल्लाउद्दीन, बाबर, तैमुर, नादीर, शेर प्रभृति कुणाच्याही
ेनापतीत्वाचा कुठेंही पुरावा नाहीं. कदाचित् मुसलमान लेखकांनाही या विष-
ाचें ज्ञान नसावें.

अकबराच्या काळापासून सेनापतीत्वाचा थोडा बहुत पुरावा मिळू शकतो.
अकबर, शिवाजी, अहमद अब्दाली, हैदर अली प्रभृतींच्या ठायीं सेनापतीत्वाचें
ाणि रण-पांडित्याचें लक्षण असल्याचें दिसून येतें. भारतवर्षाच्या इतिहासांत
या रणपंडितांच्या कथा आहेत त्यांच्यापेक्षां राजसिंह कोणत्याही प्रकारें उणा
व्हता. युरोपांत देखील त्याच्या तोडीचे रणपंडित क्वचितच जन्मले असतील.
ोड्याशा सैन्याच्या बळावर मोठमोठ्या लढाया जिंकणाऱ्या वीरांत राजसिंहाची
गना होती.

चार भागांत विभक्त झालेल्या औरंगजेबच्या महान् सैन्यापुढें तोंड देण्या-
ाठीं रणपंडिताच्या दृष्टीनें जें करणें अवश्य होतें तें राजसिंहानें पहिल्यानें करून
ाकलें. पर्वतमालेच्या बाहेर राज्यांतला जो सपाट जमिनीचा विभाग होता तो
ोडून देऊन त्यानें आपलें सैन्य पर्वतावर नेऊन ठेवून दिलें.

त्यानें आपल्या सैन्याचे तीन विभाग केले होते. पहिला भाग त्यानें आपला
डिल मुलगा जयसिंह याच्या ताब्यांत देऊन तो पर्वतशिखरावर संस्थापित

केला होता. दुसरा भाग दुसरा मुलगा भीमसिंह याच्या ताब्यांत देऊन पश्चिमेकडे ठेवला होता. त्या बाजूचा रस्ता मोकळा ठेवल्यामुळें इतर रजपूत त्या रस्त्यानें प्रवेश करून प्रसंगीं मदत करतील अशी त्यावेळची योजना होती. तिसऱ्या भागाचें आधिपत्य त्यानें स्वतः स्वीकारलें होतें आणि नयन नांवाच्या पर्वतावर तो दबा धरून बसला होता.

अजमशहा आपलें सैन्य घेऊन ज्या विभागांत आला तिथल्या पर्वतमालेमुळें त्याची गति कुंठित झाली. ते पर्वत चढून जाणें अशक्य होतें, कारण वरून जसा गोळीबार होत होता तशाच शिळाही फेंकल्या जात होत्या. तो पुष्कळ प्रकारें धडपड करीत होता. पण आंत प्रवेश करणें त्याला अशक्य झालें होतें.

औरंगजेबाच्या बरोबर अजमीरचा अकबर येऊन मिळाला. त्या बाजूला तीन रस्ते मोकळे होते. तिथें दोन्हीं सैन्यें घेऊन पितापुत्र येऊन पोंचले. हे तीनही रस्ते डोंगरी होते. एकाचें नांव दुबारी, दुसऱ्याचें नांव बेलवाडा आणि तिसरा पूर्वी उल्लेखिलेला नयन. दुबारीला येऊन पोंचल्यावर अकबरशहाला त्या रस्त्यानें पन्नास हजार सैन्यासह पुढें चाल करण्याची सूचना देऊन स्वतः औरंगजेब उदयसागर नांवाच्या प्रख्यात सरोवराच्या कांठावर छावणी ठोकून कांहीं काळपर्यंत विश्रांति घेण्याचा प्रयत्न करीत होता.

शहाजादा अकबर डोंगरी रस्त्यानें उदयपुरांत प्रवेश करण्यासाठीं निघाला. वाटेंत त्याला कुणीही अडविलें नाहीं. वाटेंत त्याला वाडे दिसले, उपवनें दिसलीं, सरोवरें आणि त्यांत असलेली छोटीं बेटेंही दिसलीं, पण तिथें कुठेंच एकादा माणूस दिसून आला नाहीं. सर्वत्र अगदीं सामसूम होतें असें पाहून अकबरानें तिथें छावणी ठोकली. आपल्या फौजेच्या भीतीनें देशांतले लोक पळून गेले असावेत असें त्याला वाटलें.

मोगलांच्या छावणींत नाचरंग तमाशे सुरू झाले होते. सारेच बेसावध होते. अशा वेळीं झोंपलेल्या वाटसरूवर झेप घालावी त्याप्रमाणें कुमार जयसिंग शहाजादा अकबरच्या छावणीवर तुटून पडला. मोगलांची दाणादाण उडाली. पन्नास हजार फौजेंतले फारच थोडे लोक वांचून परत फिरले आणि शहाजादा गुजारतच्या बाजूनें पळून गेला.

माझुमशहा हा शहाआलम या नांवानें ओळखला जात होता. दक्षिणेंतलें

सैन्य गोळा करून अहमदाबादमार्गे तो पर्वतमालेच्या पश्चिम विभागांत येऊन पोंचला. त्या मार्गाला रणराव मार्ग असें नांव होतें. तो मार्ग ओलांडून काकर्लीच्या बाजूच्या सरोवराच्या विभागांत येऊन पोहोंचला. पहातों तो पुढें रस्ता नाहीं. त्यांतून वाट काढून पुढें जातां येत नव्हतें. त्याला असें दिसून आलें, कीं रजपूतांनीं त्याच्या मागच्या बाजूचा रस्ता बंद केला तर रसद आणायला मार्ग रहाणार नाहीं आणि उपाशी मरण्याची पाळी येईल. जातिवंत सेनापतींना माहित असतें, कीं नुसते हातानें मारूनच युद्ध होत नाहीं, पोटावर मारलें तरीही तें कठिण जातें. आधीं पोटाची तजवीज कायम राखल्याशिवाय हात उचलायचा नाहीं हीच जातिवंत सेनापतींची प्रथा असते. म्हणूनच शहाआलमनें यापुढें चाल करून जाणें बंद ठेवलें.

राजसिंहाच्या कारवाईमुळें बंगालमधून आलेलें सैन्य आणि दाक्षिणात्यांचें सैन्य पावसाळ्यांत सांपडलेल्या वानरांच्या दलाप्रमाणें हातपाय बांधून बसून राहिलें. मुलतानची सेना छिन्नभिन्न होऊन वादळांतल्या धुळीसारखी कुठल्याकुठें उडून गेली होती. राहतां राहिला खुद्द बादशहा—दुनियाबाद बादशहा आलमगीर.

: २ :

● शहाजादा अकबरची पुढें रवानगी करून खुद्द बादशहा उदयसागरच्या कांठावर छावणी ठोकून बसला होता. मोगलांची दिल्ली पाहून पाश्चिमात्य प्रवासी म्हणत असत, कीं दिल्ली म्हणजे एक नुसती मोठी छावणीच होय. अर्थात् मोंगल बादशहाची ही छावणी म्हणजे तात्पुरती वसलेली दिल्लीनगरीच होती. नगरांत ज्याप्रमाणें चौक असतात, त्याचप्रमाणें मोठमोठे चौक आंखून तंबू ठोकले होते. अशा असंख्य चौकांतून एक महानगरी वसविण्यांत आली होती. या सर्वांच्या मध्यभागीं बादशहाच्या तंबूचा चौक होता. दिल्लींत ज्याप्रमाणें मोठमोठ्या महालांतून बादशहा रहात असे तशाच प्रकारचे किंमतवान वस्तूंनीं सजविलेले महाल इथेंही उभारले होते. तसेच आमदरबार आणि खास दरबार, आणि रंगमहालही होते. बादशहाचे हे तंबू केवळ कापडी नव्हते. त्यांच्यासाठीं लोखंड आणि पितळहि वापरली होती आणि त्यांना दोन तीन

खणही होते. समोर दिल्लीच्या किल्ल्यासारखा मोठा दरवाजा उभारला होता. किल्ल्याला जसे बुरुज असतात तसेच इथेंही बुरुज उभारले होते. दरबारच्या तंबूला वर सुवर्णखचित चांदवा केलेला होता. खालीं किमती गालिचा पसरलेला होता. आणि मध्यें रत्नखचित राजसिंहासन होतें. चारही बाजूंना शस्त्रधारी तार्तारी बायकांचा पहारा होता.

या राजवाड्याच्या पलीकडे अमीर उमरावांचे असेच सजवलेले तंबू होते. कित्येक कोसपर्यंत हे तंबू पसरलेले होते. ह्यांतले कांहीं तांबडे, तर कांहीं पिवळे, कांहीं पांढरे कांहीं हिरवे नि कांहीं निळेही होते. सर्वांवरचे सोन्याचे कळस सूर्यकिरणांत झळाळत होते.

सरोवराच्या कांठावर चारही बाजूंना दिल्लीच्या चौकाप्रमाणेंच दुकानें उभारलेलीं होतीं. एकापुढें एक बाजार वसविलेले होते. बादशहाच्या आगमना-मुळें एकाएकीं उदयसागरच्या कांठावर ती रमणीय महानगरी अस्तित्वांत आलेली पाहून सारे लोक आश्चर्यचकित झाले.

बादशहा ज्यावेळीं अशी छावणी उभारीत असे त्यावेळीं अंतःपुरांतील सारे लोक त्याच्याबरोबर येत असत. साऱ्या बेगमाही येत असत. यावेळींही त्या तशा आल्या होत्या. जोधपुरी, उदेपुरी आणि जेबुन्निसाही आली होती. जोधपुरीबरोबर निर्मलकुमारीही आली होती. दिल्लीच्या रंगमहालांत ज्याप्रमाणें त्यांना वेगवेगळे महाल करून दिलेले असत त्याचप्रमाणें या छावणींतही त्यांचे वेगवेगळे महाल होते.

या ऐषआरामी छावणींत औरंगजेब एके दिवशीं रात्रीच्या वेळीं जोधपुरीच्या महालांत आला होता. निर्मलकुमारीही त्यावेळीं तिथें होती. बादशहा निर्मलला ' इमली बेगम ' म्हणून हांक मारीत असे. पहिल्यानें तो तिला ' निमली बेगम' म्हणत होता. पण शेवटीं त्या शब्दाचा विपर्यास होऊन ती ' इमली बेगम ' झाली. बादशहानें निर्मलला विचारलें. " इमली बेगम, तूं आमची कीं रजपूतांची ? "

निर्मल हात जोडून म्हणाली, " दुनियेचे बादशहा आपण, आपल्याला सारं कांहीं कळतं. आपणच काय तो निर्णय द्यावा. "

औरंगजेब म्हणाला, " माझा निर्णय आहे तो असा—तूं रजपूताची बेटी, तुझा नवराही रजपूत, तूं रजपूताच्या राणीची सखी, अर्थात् तूं रजपूतच ? "

" जहांपन्हा, हा निर्णय बरोबर आहे का ? " निर्मल म्हणाली, " मी रजपूताची बेटी खरी. पण हजरत जोधपुरीही तशीच ना ? आपली आजी आणि पणजीही रजपूतच--त्या साऱ्या मोगल बादशहाच्या हितकांक्षिणीच होत्या ना ? "

" त्या मोगल बादशहांच्या बेगमा होत्या, तूं रजपूताची बायको आहेस. " बादशहा म्हणाला.

निर्मल हंसली आणि म्हणाली, " मी शहानशहा अलमगीर बादशहाची ' इमली बेगम.' "

" पण तूं रूपनगरच्या राणीची सखी आहेस. "

" जोधपुरीचीही सखी आहें मी ! "

" तर मग तूं आमची आहेस—होय ना ? "

" तें काय तें आपणच ठरवा. "

" मला तुझ्यावर एक काम सोंपवायचं आहे. " औरंगजेब म्हणाला, " तें माझ्या हिताचं आहे, पण त्यांत राजसिंहाचं अकल्याण आहे. या कामाचा भार तुझ्यावर सोंपवला तर तें करशील का तूं ? "

" काम कोणतं तें कळल्याशिवाय मला कांहीं सांगतां यायचं नाहीं. " निर्मल म्हणाली, " देवब्राह्मणांना अनिष्ट अशी गोष्ट माझ्या हातून व्हायची नाहीं. "

" असलं कांहीं काम मी तुला सांगणार नाहीं. " औरंगजेब म्हणाला, " मी उदयपुर काबीज करणार—राजसिंहाची राजधानी माझ्या ताब्यांत येणार यांत शंकाच नाहीं. राजधानी ताब्यांत आली तरी रूपनगरची राजकन्या हस्तगत होईल कीं नाहीं याबद्दल मी साशंक आहें. या कामीं तूं मदत करशील का मला ? "

निर्मलकुमारी म्हणाली, " गंगायमुनेची शपथ घेऊन मी सांगतें, कीं आपण जर उदयपुरची राजधानी काबीज केली तर चंचलकुमारीला आणून मी आपल्या स्वाधीन करतें. "

" तुझा शब्द मला पुरेसा आहे. " औरंगजेब म्हणाला, " माझ्याशीं

जो प्रतारणा करील त्याला मी कोल्ह्याकुत्र्याकडून फाडफाडून खायला लावीन हें माहित आहे तुला?"

"तें सर्वांनाच माहित आहे." निर्मल म्हणाली, "मी शपथेवर सांगतें, कीं मी आपल्याशीं प्रतारणा करणार नाहीं. प्रश्न आहे तो एवढाच, कीं आपण राजधानी काबीज कराल त्यावेळीं ती जिवंत असेल कीं नाहीं? शत्रुच्या हातांत पडण्याचा प्रसंग आला कीं रजपूतांच्या राण्या पेटत्या खाईंत उड्या घेत असतात. ती जिवंत सांपडणार नाहीं ही खात्री आहे मला, म्हणूनच मी कबुली दिली. नाहींतर चंचलकुमारीचं अनिष्ट करायला मी केव्हांही कबुली दिली नसती."

"यांत अनिष्ट कसलं?" औरंगजेब म्हणाला, "ती बादशहाची बेगम होईल ना!"

निर्मल यावर उत्तर देणार होती तोंच एक खोजा आला आणि म्हणाला, "पेशकार दरबारांत हजर झाला आहे. जरुरी अर्जी पेश करणार आहे. हजरत शहाजादा अकबरशहा यांच्याकडून बातमी आली आहे."

औरंगजेब अत्यंत अस्वस्थ होऊन दरबारला गेला. पेशकारनें अर्जी पेश केली. अकबरची पन्नास हजार मोगलसेना बहुतांशीं छिन्नभिन्न होऊन गेली असून शिल्लक राहिलेले सैनिक कुठें पळून गेलें त्यांचा पत्ता नाहीं, ही बातमी अंतगृहात येऊन पोंचली. ती ऐकतांच निर्मलकुमारीनें नाचाचा पोषाख चढवून दार बंद केलें आणि जोधपुरी बेगमेच्यासमोर रूपनगरी नाच करून दाखवला.

नाचाचा वेष टाकून देऊन निर्मलकुमारी पुन्हां पूर्वीसारखी होऊन बसली होती, त्यावेळीं बादशहानें तिला बोलावणें पाठवलें. ती बादशहासमोर हजर झाली तेव्हां बादशहा म्हणाला, "आम्ही छावणी उठवतों आहों. आतां लढाईला निघणार--आतां तुला उदेपुरला जायचं आहे का?"

निर्मलकुमारी म्हणाली, "नाहीं. मी फौजेबरोबरच जाईन. वाट असतांना जिथं मला सोयीचं वाटेल तिथून मी निघून जाईन."

औरंगजेब थोडासा नाराज होऊन म्हणाला, "कां जाणार आहेस?"

"शहानशहाच्या हुकुमानं." निर्मल म्हणाली.

औरंगजेब पुन्हां खुषींत येऊन म्हणाला, " मी जर तुला जाऊं दिलं नाहीं, तर या अंतःपुरांत कायमची राहायला तूं कबूल आहेस का ? "

निर्मलकुमारी हात जोडून म्हणाली, " मला नवरा आहे, खाविंद. "

औरंगजेब म्हणाला, " तूं इस्लाम धर्म स्वीकारलास, तो नवरा सोडलास, तर मी तुला उदेपुरीपेक्षांही जास्त थाटांत ठेवीन. "

तें ऐकून निर्मल हंसली, पण अदबीनें म्हणाली, " तें होणं नाहीं, जहांपन्हा."

" कां होणं नाहीं ? बादशहानें विचारलें. " रजपूत राजांच्या कितीतरी मुली मोंगलांच्या घरीं आल्या आहेत. "

" त्या कांहीं आपला नवरा टाकून आल्या नाहींत ! "

" तुला नवरा नसता, तर आली असतीस का तूं ? "

" आतां कशाला तो प्रश्न ? "

" कां तें सांगायला मला शरम वाटते. " औरंगजेब म्हणाला, "कुणालाच, मी असं कांहीं बोललों नव्हतों. मी आतां बुड्ढा झालों आहें पण उभ्या आयुष्यांत मी कुणावरच प्रेम केलं नव्हतं. आतां या उतारवयांत तुझ्यावर माझं प्रेम बसलं आहे. आपलं लग्न झालं नसतं तर तूं माझी बेगम झाली असतीस असं जर तूं म्हटलंस, तर माझ्या या स्नेहशून्य हृदयांत—या जळक्या पहाडासारख्या हृदयांत—थोडातरी ओलावा उत्पन्न होईल. "

निर्मलला औरंगजेबाचें तें भाषण खरें वाटलें. यावेळीं त्याच्या आवाजांतच त्याच्या अंतःकरणाचा हळवेपणा प्रतीत होत होता. क्षणभर तिला वाईट वाटलें. ती म्हणाली, " जहांपन्हा, आपल्या प्रेमाला पात्र होण्याजोगं या बाँदीनं असं कोणतं काम केलं ? "

" तें सांगतां येत नाहीं. " औरंगजेब म्हणाला, " तूं सुंदर आहेस. पण सौंदर्यावर भाळण्याइतकं आतां माझं वय राहिलेलं नाहीं. तूं सुंदर असलीस तरी उदेपुरीच्या तोडीला तूं येणार नाहींस. तुझ्याखेरीज आजपर्यंत कुणीही माझ्यासमोर खरंखरं बोललं नाहीं म्हणूनच मला असं वाटतं, कीं तुझी बुद्धी, तुझं चातुर्य, तुझं साहस पाहून माझी राणी व्हायला तूंच लायक आहेस असं मला वाटल. तें कांहीं कां असेना, हा अलमगीर बादशहा तुझ्याखेरीज दुसऱ्या कोणत्याही स्त्रीवर कधीं भाळला नव्हता—दुसऱ्या कुणाच्याही कटाक्षाला मोहित झाला नव्हता. "

निर्मल म्हणाली, " शहानशहा, रूपनगरच्या राजकन्येनं मला एकदां विचारलं होतं, कुणाशीं लग्न करावं असं तुला वाटतं ? मी तिला उत्तर दिलं होतं, अलमगीर बादशहाशीं. तिनं मला विचारलं, कां म्हणून ?—मी म्हटलं, लहानपणीं मी एक वाघ पाळला होता. वाघाला माणसाळण्यांत मला मोठा आनंद वाटे. तसलाच आनंद बादशहाला वश करण्यांत मला वाटेल, असं मी तिला म्हटलं होतं. माझ्या भाग्यानं लग्न व्हायच्यापूर्वी आपली माझी भेट झाली नाहीं. मी ज्या एका दीनदरिद्री माणसाला नवरा म्हणून माळ घातली आहे त्याच्या सहवासांतच मी सुखी आहें. आतां मला निरोप द्या. "

एक मोठा सुस्कारा सोडून औरंगजेब म्हणाला, " दुनियेचा बादशहा झाला तरी तो कांहीं सुखी नसतो. आशा हावरी आहे. ती मिटत नसते. या जगांत मी केवळ तुझ्यावरच प्रेम केलं, पण तूं माझी झाली नाहींस. तुझ्यावर माझं प्रेम आहे म्हणूनच मी तुला अटकावून ठेवीत नाहीं—तुला सोडून देतों. ज्या-योगें तूं सुखी होशील तेंच करायचं आहे मला. तुला दुःख होईल अशी कोणतीही गोष्ट मी करणार नाहीं. आतां तूं जा. मला विसरूं नकोस. माझ्याकरवीं तुझं कोणतंही काम होण्याजोगं असेल तर तें मला कळव, मी तें आनंदानं करीन. "

निर्मलनें कुर्निसात केला. ती म्हणाली, " माझं एकच मागणं आहे—उभयपक्षाच्या कल्याणासाठीं संधि करावा अशी मागणी मी ज्यावेळीं करीन त्यावेळीं आपण माझं म्हणणं ऐकून घ्यावं."

औरंगजेब म्हणाला, " त्याचा विचार आपण त्याचवेळीं करूं. "

त्यावेळीं निर्मलनें औरंगजेबाला आपल्याकडचें कबूतर दाखवलें. ती म्हणाली, " हें शिकवलेलें कबूतर आपण ठेवून द्या. या दासीची ज्यावेळीं आपल्याला जरूर लागेल त्यावेळीं हें कबूतर मोकळं करा. मला आपल्याला जें कांहीं सांगायचं असेल तें मी याच्याकरवीं सांगेन. मी सध्यां या सैन्याबरोबरच राहणार आहें. ज्यावेळीं मला इथून निरोप घ्यावासा वाटेल त्यावेळीं मला मोकळीक द्यायला आपण बेगमसाहेबांना सांगून ठेवा. "

त्यानंतर औरंगजेब आपल्या फौजेची चालना करण्याच्या उद्योगाला लागला.

यावेळीं औरंगजेबाचें मन फार विषण्ण झालें होतें. निर्मलसारखें वाक्चातुर्य, स्पष्टवक्तेपणा आणि निर्भय वृत्ती त्यानें दुसऱ्या कुणाच्याच ठायीं कधीं पाहिली

नव्हती. कुठलाही राजा मग तो शिवाजी असो कीं राजसिंह असो, कुठलाही सेनापती मग तो दिलीर असो कीं तैवान असो, कुठलाही शहाजादा मग तो आझीम असो कीं अकबर असो, अशा प्रकारें निर्भयपणानें स्पष्ट बोलला असता तर औरंगजेबानें तें केव्हांही सहन केलें नसतें; पण असहाय अशा निर्मल-कुमारीसारख्या रुपवतीच्या तोंडची तीच भाषा त्याला मोठी गोड वाटली होती. कोणत्याही वृद्धावर मदनदेवाच्या बाणाचा जेवढा परिणाम होणें शक्य होतें तेवढा तो त्याच्यावर झाला होता.

प्रेमांध व्यक्ति प्रियवस्तुच्या वियोगामुळें शोकाकुल होते, पण औरंगजेब मात्र थोडा विषण्ण झाला एवढेंच.

औरंगजेब म्हणजे मार्क अंथनी नव्हता कीं अग्निवर्णही नव्हता—कांहीं झालें तरी माणूस कधीं पाषाण होत नाहीं.

: ३ :

पहांटे बादशहाच्या फौजेनें कूच करायला सुरवात केली. सुरवातीला रस्ता मोकळे करणारें सैन्य कुदळ, कुऱ्हाड, पहार वगैरे घेऊन पुढें चालू होऊन कामाला लागलें. वाटेंत येणारीं झाडें तोडणें, रस्ता साफ करणें, रस्त्यावरचे खड्डे बुजवणें, आणि सैन्य जाण्यासाठीं रस्ता प्रशस्त करण्याच्या कामाला त्यांनीं सुरवात केली. त्या रस्त्यानें गाड्यांवर चढवलेल्या तोफा आणि त्यांच्या मागोमाग गोलंदाज फौज चालून गेली. त्या गोलंदाजी गाड्यांच्या गडगडाटानें ऐकणाऱ्यांच्या कानाच्या कानठाळ्या बसत होत्या. त्यांच्या चालीमुळें उडणाऱ्या धुळीनें रस्ता दिसत नाहींसा झाला होता.

गोलंदाज फौजेच्या मागोमाग खजिना होता. औरंगजेब बादशहा दिल्लींतल्या लोकावर विश्वास ठेवीत नसल्यामुळें आपला खजिना सदोदित आपल्या बरोबर बाळगीत असे. औरंगजेबाच्या राजवटीचा मूलमंत्र म्हणजे सर्वावर अविश्वास. इतिहासाकडे पाहिलें असतां असें दिसून येतें, कीं औरंगजेब या मुलुखगिरीवर निघाला तो पुन्हां दिल्लीला गेलाच नाहीं. इथूनच दक्षिणेंत जाऊन त्यानें तिथेंच देह ठेवला.

हत्तीवरून चाललेल्या या खजिन्याच्या मागोमाग बादशहाचा दप्तरखाना

होता. थराथरानें गाडी, हत्ती, उंट याच्यावरून खतें, पत्रें आणि दप्तरें वाहून नेण्यांत येत होतीं. त्याच्या मागोमाग गंगेचें पाणी घेऊन जाणारा उंटाचा काफिला होता. पवित्र म्हणून नव्हे, पण उत्कृष्ट पेय या नात्यानें औरंगजेब सदोदित गंगेचें पाणीच उपयोगांत आणीत असे.

या पाण्याच्या उंटांच्या मागोमाग खाद्यपदार्थांचा काफिला होता. आतां तूप, डाळ, तांदूळ, मसाला, नानाप्रकारचे पक्षी, चतुष्पाद प्राणी, पक्क आणि अपक्क खाण्याचे जिन्नस भरलेल्या गाड्या जात होत्या. त्यांच्याबरोबर हजारों हजार बबर्जी होते. त्याच्या मागोमाग पोषाखखातें—पेहरण्याचे कपडे, बैठका, गाद्या, तक्के वगैरेंच्या गाड्या होत्या. आणि या सर्वांच्या मागोमाग असंख्य घोडेस्वारांची मोगलसेना होती.

हा झाला सैन्याचा पहिला भाग. दुसऱ्या भागांत खुद्द बादशहा होता. सर्वांच्यापुढें उंटावर सुगंधी द्रव्यें होतीं. धूप, गुग्गुळ, चंदन, अबीर, कस्तुरी, वगैरे सुगंधी द्रव्यांच्या घमघटानें सारा रस्ता सुवासिक झाला होता. याच्यापुढें बादशहाची खास फौज होती. हे सारे स्वार होते. त्यांचे घोडे अस्सल अरबी असून ते रस्त्याच्या दोन्ही बाजूनें रांगेत चालले होते. मध्यावर खुद्द बादशहा रत्नखचित जिन असलेल्या घोड्यावर बसून चालत होता. त्याच्या माथ्यावर पांढरें शुभ्र छत्र धरलेलें होतें.

या सर्वांच्यामागें बादशहाचा कबिला होता. या सर्व बायका भल्या मोठ्या हत्तीच्या पाठीवरच्या मखमलीनें मढवलेल्या हौद्यांत बसलेल्या होत्या. हें एक भले मोठें हत्तीचें खिल्लारच होतें. कांहीं बायका किनखापानें मढवलेल्या मेण्यांत बसलेल्या होत्या. जोधपुरी आणि निर्मलकुमारी, उदेपुरी आणि जेबुन्निसा ह्या हत्तीच्या हौद्यांत होत्या. उदेपुरी हंसतमुख होती तर जोधपुरी खिन्न मुद्रा करून बसली होती. निर्मलकुमारी तिला खुषींत आणायचा प्रयत्न करीत होती. जेबुन्निसा मात्र उन्हाळ्यांत वाळलेल्या वेलीसारखी म्लान होऊन पडलेली होती.

या खास कबिल्याच्यामागें घोड्यावर बसलेल्या नातेवाईक बायका आणि दासी होत्या. आणि त्यांच्यामागें पुन्हां गोलंदाजांचा काफिला होता, पण त्यांच्या तोफा अगदींच लहान होत्या.

तिसऱ्या विभागांत पायदळ सैन्य होतें. त्यांच्यामागें दासदासी, मजूर कामगार, नर्तकी प्रभृति पेंढार आणि रिकामे घोडे, तंबूचें सामान असा किरकोळ सरंजाम होता.

अशा मोठ्या थाटांत ही प्रचंड सेना जबडा पसरलेल्या मगरीसारखी राजसिंहाचें राज्य गिळण्यासाठीं निघाली होती.

वाटेंत एकदम एक अडथळा उत्पन्न झाला. अकबर ज्या रस्त्यानें आपलें सैन्य घेऊन गेला होता त्याच रस्त्यानें आतां औरंगजेबही निघाला होता. अकबरशहाचें सैन्य वाटेंत गांठून दोन्हीं सैन्यानीं मिळून कुमार जयसिंहाच्या सैन्यावर हल्ला करायचा असा औरंगजेबाचा उद्देश होता. जयसिंहाच्या सैन्याचा विध्वंस करून मग उदयपुरांत प्रवेश करायचा असें त्यानें ठरवलें होतें. तो पहाडी रस्ता चढून जायच्या पूर्वीं औरंजेबाला कळून आलें, कीं पर्वताच्या वर त्याच रस्त्याच्या मागें राजसिंह आपलें सैन्य घेऊन हजर झाला होता. पूर्वीं राजसिंह नयन नांवाचा पहाडी रस्ता रोखून बसला होता खरा, पण अकबर त्याच रस्त्यानें येतो आहे असें हेराच्या तोंडून कळल्या-मुळें ससाण्यासारखी झडप घेऊन पहाडी रस्ता ओलांडून जाऊन राजसिंहानें आपलें सैन्य या मोक्याच्या जागीं आणून ठेवलें होतें.

राजसिंहाच्या या रणपांडित्यामुळें मोगल घाबरून गेले. मोगलांची फौज ज्या रस्त्याने जात होती, त्या रस्त्यानें ते पुढें गेले असते तर राजसिंह हा मागच्या बाजूला राहला असता. शत्रुच्या सैन्याला मागें ठेवून पुढें चाल करून जाण्या-सारखे दुसरें संकट नाहीं. मागल्या बाजूनें हल्ला झाला तर पीछेहाट घेणें अशक्य होतें आणि मग शत्रूलाही प्रतिपक्षाला ठेंचून काढणें सोपे जातें. मागें असलेल्या शत्रुला तोंड देतां येतें खरें, पण तसें करतांना आपल्या सैन्याचें तोंड फिरवून शत्रुला समोर घेणें धोक्याचें असतें हें औरंगजेबाला माहित होतें. या पहाडी रस्त्यांत एवढें मोठें सैन्य एकदम फिरवून घेण्याइतकी पुरेशी जागाही नव्हती. सैन्य फिरवून घेण्याचा प्रयत्न चालू असतां राजसिंह पर्वत उतरून खालीं आला असता आणि त्या सैन्याचे दोन भाग पाडून त्यानें नेस्तनाबूत केले असते. हें जोखीम पत्करणें घातक ठरलें असतें.

कदाचित् असेंही झालें असतें,—राजसिंहानें याच ठिकाणीं लढाईला

तोंड दिलें नसतें. औरंगजेबाचें सैन्य त्यानें बिनधोक पुढें जाऊं दिलें असतें आणि तें तसें गेल्यानंतर राजसिंहानें पर्वतावरून खालीं उतरून औरंगजेबाच्या सैन्यावर मागल्या बाजूनें हल्ला केला असता आणि मग रसद मिळायचा मार्ग बंद झाला असता. समोर कुमार जयसिंहाचें सैन्य होतें. एका बाजूला राजसिंहाचें सैन्य आणि दुसऱ्या बाजूला जयसिंहाचें सैन्य याच्यांमध्यें सांपडून बादशहाची सांपळ्यांत सांपडलेल्या उंदरासारखी स्थिति झाली असती आणि त्याचा ससैन्य विध्वंस झाला असता.

अशा प्रकारें दिल्लीचा हा पराक्रमी बादशहा जाळ्यांतल्या माशासारखा अडकून पडला होता. मागें फिरावें तर राजसिंह त्याच्या मागोमाग होता. उदयपुरचें राज्य नष्ट करून टाकण्यासाठीं तो निघाला होता तें बाजूलाच राहून आतां तो उदयपुरच्या राजाच्या पकडींतच सांपडला होता. राजसिंहानें टाळ्या पिटल्या असत्या आणि सारें जग हंसलें असतें. यापुढें काय करावें हाच मोठा प्रश्न होता. औरंगजेबाला वाटलें, उंदराच्या भयानें सिंहानें का पळ काढायचा!

पळ काढण्याचा प्रश्न त्यानें मनांतून काढून टाकला. तर मग दुसरें काय करायचें? एकच उपाय होता—हे रस्ते सोडून उदेपुरला जायचा मधलाच रस्ता शोधून काढायचा. औरंगजेबाच्या हुकुमानें चोंही बाजूनें घोडेस्वार निघाले. ते नवा रस्ता शोधून काढणार होते. औरंगजेबानें निर्मलकुमारीकडे माणूस पाठवून पत्ता काढायचा प्रयत्न केला. निर्मलकुमारी म्हणाली, " मी पडदानशीन बायकोमाणूस. कुठला रस्ता कुठं आहे तें मला कसं कळावं ? "

थोड्याच वेळांत बातमी आली—उदयपुरला जायचा आणखी एक रस्ता आहे. एक मोगल सौदागर भेटला. त्यानें हा रस्ता दाखवून देण्याचा पत्कर घेतला. एक मनसबदार तो रस्ता पाहूनही आला. तो रस्ता म्हणजे दोन डोंगरांच्या मधली एक खिड होती. ती अगदीं चिंचोळी असली तरी रस्ता अगदीं सरळ सरळ होता. थोडक्याच वेळांत त्यांतून पलीकडे जाणें शक्य होतें. ज्या मोगलानें ही बातमी दिली होती त्यानें सांगितलें, कीं त्या बाजूला कुठलीच रजपूत सेना नव्हती.

औरंगजेब विचारांत पडला. तो म्हणाला, " आतां नसेल, पण कुठंतरी सैन्य छपून राहिलेलं असणं शक्य आहे. "

ही बातमी घेऊन येणारा मनसबदार बखतखां म्हणाला, " ज्या मोगलानें पहिल्याने आम्हाला या रस्त्याची बातमी दिली त्यालाच मी डोंगर चढून टेहळणी करायला सांगितलं आहे. पलिकडे कुठं रजपूत सेनेचा ठाव लागला तर तो लगेच येऊन आम्हाला सावध करणार आहे. "

औरंगजेबानें विचारलें, " तो आमचाच शिपाई आहे का ? "

बखतखा म्हणाला, " नाहीं. तो एक सौदागर आहे. तो उदयपुरांत शाली विकायला गेला होता. तिथून तो आमच्या छावणींत त्याच कामासाठीं आला होता. "

औरंगजेब म्हणाला, " ठीक आहे. तर मग त्याच रस्त्याने आतां फौज घेऊन जाऊं. "

बादशहाच्या हुकुमानें फौज मागें फिरली. फिरली खरी, पण त्या फिरण्यांत सारी उलटापालट झाली होती. खिंडींतून प्रवेश करायचा असल्यामुळें पूर्वी ज्या अनुक्रमानें फौज चाल करून जात होती, तो अनुक्रम आतां बदलावा लागला होता. जो भाग आघाडीला होता, तो आतां पिछाडीला पडला होता आणि पिछाडीचें सैन्य आघाडीनें चालूं झालें होतें. सैन्याचा तिसरा भाग सर्वांच्या पुढें होता. तंबू, सामानसुमान आणि पेंढार या सर्वांनीं उदयसागरच्या रस्त्यानें जावें असा बादशहानें हुकूम सोडला. सारें सैन्य खिंडींतून पुढें गेल्यावर मग त्यांनीं यावें असें ठरवलें. स्वतः औरंगजेब पायदळ आणि छोट्या तोफा असलेली गोलंदाज फौज घेऊन खिंडींत शिरला. बखतखां पुढें राहून रस्ता दाखवीत होता. तें पाहून राजसिंहानें पर्वतावरून खालीं उतरून मोगल सैन्यावर एकदम झडप घातली. मोगल सैन्याचे एकदम दोन भाग झाले. एक भाग औरंगजेबाबरोबर खिंडींत शिरला होता आणि दुसरा भाग पूर्वीच्या रस्त्यावर राजसिंहाच्या समोरासमोर आला होता.

मोंगलावर अत्यंत बिकट प्रसंग ओढवला होता. हत्ती, घोडे आणि मेण्यांतून बादशहाचा जो कबिला चालला होता त्याच्या अगदीं समोरासमोर राजसिंह आपल्या सैन्यासह येऊन हजर झाला. घारीनें झेप घातल्यावर चिमण्यांचा घोळका जसा किलबिलाट करतो तसा त्या साऱ्या बायका भेदरून ओरडूं

लागल्या. त्यांच्या जोडीला जे रखवालदार होते, त्यांना शस्त्र उचलून जाणें अशक्य झालें, कारण तिथल्या बेगमा धोक्यांत आल्या असत्या. रजपूतांनीं लढाई केल्याशिवाय या सर्वांना कैद केलें. साऱ्या राण्या आणि त्यांच्या घोड्यावर बसलेल्या दासदासी युद्ध केल्याविना राजसिंहाच्या कैदी झाल्या.

माणिकलाल सदोदित राजसिंहाच्या पाठोपाठ असे. राजसिंहाची त्याच्यावर फार मर्जी होती. तो राजसिंहापाशीं आला आणि म्हणाला, " हा सारा दिल्लीचा कबिला आतां कुठं ठेवायचा ? दहीं-दूध लोण्यावर ताव मारण्यासाठीं या मांजरींना उदयपुरला पाठवून देऊं का ? "

राजसिंह हंसला आणि म्हणाला, " एवढं दहीं-दूध उदयपुरांत मिळायचं नाहीं. दिल्लीच्या मांजरींचं पोट फार मोठं आहे म्हणतात. तेवढ्या एका उदेपुरी बेगमेला राणी चंचलकुमारीपाशीं पाटवून दे. राणीनं मला मुद्दाम आग्रह करून तसं सांगितलं आहे. ही बाकीची सारी दौलत औरंगजेबाची औरंगजेबाकडे जाऊं दे. "

माणिकलाल हात जोडून म्हणाला, " हा लुटीचा माल आहे. सैनिकांना मिळेल का यांतला थोडा ? "

राजसिंह हंसला आणि म्हणाला, " तुम्हाला कुणाला पाहिजे असला तर घ्या—पण फक्त मुसलमान. हिंदुंना हात लावायचा नाहीं. "

" नाचगाणं करणाऱ्या आहेत त्या. " माणिकलाल म्हणाला.

राजसिंह म्हणाला, " नाचगाण्यांत गुंतून पडल्यावर रजपूतांचं शौर्य शिल्लक कसं राहील ? सर्वांना सोडून दे. फक्त उदेपुरीला मात्र उदयपुरला पाठवून दे."

माणिकलाल म्हणाला, " या साऱ्या समुद्रांत तें एकटंच रत्न कसं शोधून काढायचं ? मी कांहीं तिला ओळखीत नाहीं. आपला हुकूम झाला तर मारुतीसारखा मी हा सारा गंधमादन पर्वत नेऊन राणीसाहेबांपाशीं हजर करतों. मग आपली जिन्नस त्यानी ओळखून काढावी. ज्या हव्या असतील त्यांना ठेवून घ्यावं आणि बाकीच्यांना सोडून द्यावं. उदयपुरच्या बाजारांत काजळ सुरमा विकून त्या आपलीं पोटं भरतील. "

याचवेळीं हत्तींच्या हौद्यांत बसलेल्या निर्मलकुमारीची नजर राजसिंह आणि

माणिकलाल यांजकडे गेली. तिनें दोन्ही हात जोडून दोघांना तिथूनच प्रणाम केला. तें पाहून राजसिंह माणिकलालला म्हणाला, " ही आणखी कोण बेगम? हिंदु आहेशी वाटतं—तिनं सलाम केला नाहीं—आम्हाला प्रणाम केला. "

तिला पाहतांच माणिकलाल मोठमोठ्यानें हंसत सुटला. तो म्हणाला, " ही कुठली बेगम महाराज ? ही बाँदी आहे. तिला पकडून आणायला हवी. " असें म्हणून माणिकलालनें हुकूम सोडतांच निर्मलकुमारीला उचलून आणून त्यांच्यासमोर हजर केलें. निर्मल त्यांच्यासमोर येतांच बोलायच्या ऐवजीं हंसत सुटली. तें पाहून माणिकलालनें विचारलें, " आतां हें काय आणखी? तूं बेगम केव्हांपासून झालीस ? "

डोळे गरगर फिरवीत निर्मल म्हणाली, " मैं हजरत इमली बेगम। तस्लीम दे. "

" तूं कसली आली आहेस बेगम ? " माणिकलाल म्हणाला, " तुझ्या आज्या पणज्या देखील कधीं बेगम झाल्या नव्हत्या !—पण हा वेष कां ? "

निर्मल म्हणाली, " पहिले मेरा हुकूम तालीम करो. अब बाजे बात राख. "

" जय सीताराम ! " माणिकलाल म्हणाला, " बेगमसाहेबाचा दिमाख तर पहा. "

निर्मल म्हणाली, " हमारा हुकूम यही है, की हजरत उदेपुरी बेगमसाहेबा सामनेका पंच कलसदार हौदावाले हाथीपर तशरीफ राखती है! उनको हमारा हुजुरमें हाजिर करो । "

तिच्या तोंडून हे शब्द निघायचा अवकाश माणिकलालनें तात्काळ उदेपुरी बेगमेला हत्तीच्या हौद्यांतून उतरून खालीं आणलें. उदेपुरी बुरख्यानें तोंड झांकून हौद्यांतून खालीं उतरली. माणिकलालनें एक मेणा खालीं केला आणि तो उदेपुरीच्या हत्तीपाशीं पाठवून दिला. त्या मेण्यांत बसवून उदेपुरीला समोर आणण्यांत आलें.

त्यावेळीं माणिकलाल निर्मलकुमारीच्या कानाला लागून म्हणाला, " जी,— अमली बेगमसाहेबा! आणखी एक विचारतों—"

" चूप रहो, बेतमीज ! " निर्मल म्हणाली, " मेरा नाम इमरत इमली बेगम. "

माणिकलाल म्हणाला, " ठीक आहे ! बेगमसाहेबा, जेबुन्निसा बेगमेला तूं ओळखतेस ? "

" जानते नही ? " निर्मल म्हणाली, " वह हमारी बेटी है। देखो, आगे सोनेका तीन कलशका जो हौदेपर जलुष देता है उसपर जेबुन्निसा बैठी है। "

माणिकलालनें जेबुन्निसेला हत्तीवरून उतरून मेण्यांत बसवून आणलें.

त्याचवेळीं दुसरी कुणीतरी बेगम हौद्यावरचा जरीचा पडदा बाजूला सारून तोंड बाहेर काढून निर्मलकुमारीला हांक मारीत होती. माणिकलालनें निर्मलला विचारलें, " ही आणखी कोण तुला हांक मारते आहे ? "

तिकडे पाहून निर्मल म्हणाली, " जोधपुरी बेगम—पण तिला इथं आणायचं नाहीं. मला पुन्हां हत्तीवर चढवून द्या. ती काय म्हणते आहे तें मी ऐकून येतें. "

माणिकलालनें तसें केलें तेव्हां निर्मलकुमारी जोधपुरीपाशीं गेली. तिनें हौद्यांत प्रवेश करतांच जोधपुरी म्हणाली, " मला तुमच्याबरोबर घेऊन चल. "

" असं कां म्हणतां, आईसाहेब ? " निर्मल म्हणाली.

जोधपुरी म्हणाली, " किती वेळ मी तुला सांगत आलें आहें, कीं या म्लेंछपुरीचा मला वीट आला आहे. या महापापांत यापुढं रहाणं नको. "

" तें चालायचं नाहीं, आईसाहेब. " निर्मल म्हणाली, " तुम्ही इकडे येतां कामा नये. आज जर मोंगलांचं राज्य कोसळलं तर तुमचा मुलगा दिल्लीचा बादशहा होईल. आम्ही तशी खटपट करूं. त्याच्या राजवटीखालीं आम्ही सुखान राहूं. "

" असं कांहीं बोलूं नकोस, बेटा. " जोधपुरी म्हणाली, " बादशहानं ऐकलं तर माझा मुलगा एक घटकासुद्धां वाचायचा नाहीं. विषप्रयोग होईल त्याला. "

निर्मल म्हणाली, " मी आजची गोष्ट बोलत नाहीं. वेळ येईल तेव्हां शहाजाद्याचा हक्क त्याला मिळेलच मिळेल. यावेळीं आपण मला कांहीं सांगूं नका. यावेळीं तुम्ही जर आमच्याबरोबर आलांत, तर आपल्या मुलाचं अकल्याण होईल. "

" तुझं म्हणणं खरं आहे. " जोधपुरी क्षणभर विचार करून म्हणाली, " ठीक आहे ! मी येत नाहीं. आतां तूंच जा. "

जोधपुरी बेगमेला प्रणाम करून निर्मलनें तिचा निरोप घेतला.

उदेपुरी आणि जेबुन्निसा यांना बरोबर शिपाई देऊन निर्मलकुमारीसह उदयपुरला राणी चंचलकुमारीकडे पाठविण्यांत आलें.

## : ४ :

● हत्ती, मेणे आणि घोडे यांच्यावरून जाणाऱ्या त्या सर्व स्त्रियांना राजसिंहानें खिडारांत प्रवेश करण्याची परवानगी दिली. तो सारा कबिला आंत गेल्यानंतर दोन्हीकडच्या फौजा स्तब्ध राहिल्या होत्या. औरंगजेबाची मागें राहिलेली फौज राजसिंहानें रस्ता अडवल्यामुळें पुढें जाऊं शकत नव्हती. त्या फौजेनें घोड्यांचीं तोंडें फिरवून रजपूत फौजेसमोर यायला सुरवात केली. तें पाहून राजसिंह थोडा मागें हटला आणि त्यानें त्या फौजेला निर्धोक जाऊं दिलें. लढाईला तोंड दिलें नाहीं.

ती मोगलांची फौज ' दीन दीन ' आरोळ्या ठोकीत बादशहाच्या हुकुमाप्रमाणें त्या चिंचोळ्या खिडारांत शिरली. राजसिंह पुन्हां पूर्वीच्या जागीं येऊन राहिला.

त्यानंतर बादशहाही तोषाखानांत आला. त्याचें रक्षण करायला कुणी नसल्यामुळें रजपुतांनीं तो सारा लुटून घेतला. त्यानंतर खाद्यपदार्थांचा काफिला आला, त्यावेळीं हिंदुंना उपयोगी पडतील असे जेवढे जिन्नस त्यांत होते ते राजसिंहानें आपल्या रसदेंत सामील करून घेतले. जे जिन्नस हिंदुंना घेतां आले नसते ते कांहीं डोंबाघेडांना दिले आणि बाकीचे सगळे कोल्ह्याकुत्र्यांनीं खाण्यासाठीं डोंगरावर फेंकून देण्यांत आले.

रजपुतांनीं दस्तरखाना हत्तीवरून उतरून घेतला. त्यांतील कांहीं जाळून टाकला, तर कांहीं तसाच जाऊं दिला.

त्यानंतर मालखाना—त्यांत साऱ्या पृथ्वीवर बिनमोल ठरणारी अशी धनदौलत होती. ती पाहून रजपूत सेनापती लोभापायीं पागल झाले. तीही त्यांनीं ताब्यांत घेतली.

त्यांच्या मागोमाग गोलंदाज आले त्यावेळीं राजसिंहानें आपलें सैन्य थोपवून धरलें. तो म्हणाला, "यावेळीं गडबड करूं नका. शेवटीं हें सारं तुमच्याच ताब्यांत येणार आहे. यावेळीं यांना जाऊं द्या. लढाई करायची वेळ ही नव्हे." असें म्हणून त्यानें आपलें सैन्य रोखून धरलें. औरंगजेबाची सारी फौज खिंडारांत प्रवेश करती झाली.

माणिकलालला एका बाजूला घेऊन राजसिंह म्हणाला, "त्या मोगलावर मी अत्यंत खूष झालों आहें. हा सारा पेंच इतक्या सोप्या रीतीनें उकलेल असं मला वाटलं नव्हतं. मोगलांशीं समोरासमोर तोंड देऊन लढाईंत त्यांचा विध्वंस करायचा अशी माझी योजना होती, पण आतां लढाई केल्याशिवाय मोगल नेस्तनाबूत झाले आहेत. मुबारकला आतां माझ्याकडे पाठवून दे, मला त्याचा गौरव केला पाहिजे."

माणिकलालच्या हातून पुनर्जन्म मिळाल्यानंतर मुबारक त्याच्याबरोबर उदयपुरला आल्याचें पूर्वी सांगितलेंच आहे. राजसिंहाला त्याच्या शौर्याची प्रचिती यापूर्वीच मिळाली होती, म्हणून ज्यानें मुबारकला आपच्या फौजेंत योग्य जागीं नेमणूक करून दिली होती. किती झालें तरी तो मोगल होता, अर्थात् राजसिंह त्याच्यावर पूर्णपणें विश्वास टाकायला तयार नव्हता. ही गोष्ट मुबारकच्या मनाला फार लागून राहिली होती.

म्हणूनच मुबारकनें ही अत्यंत बिकट अशी कामगिरी पत्करली आणि ती यशस्वी करून दाखविली. औरंगजेबाच्या फौजेला खिंडाराचा रस्ता ज्या सौदागरानें दाखवला तो छद्मवेषी मुबारकच होता.

राजसिंहाच्या आज्ञेप्रमाणें माणिकलाल मुबारकला घेऊन आला. राजसिंहानें खुल्या दिलानें त्याची प्रशंसा करून त्याला धन्यवाद दिले. तो म्हणाला, "खरोखरच तुझं साहस आणि चातुर्य अजब होतं. सौदागरचा वेष घेऊन मोगल सेनेला तूं ही खिंडाराची वाट दाखविली नसतीस तर आज अनेक माणसांचे निष्कारण बळी पडले असते. शिवाय, तुला कुणी ओळखलं असतं तर तूंही मोठ्या संकटांत पडला असतास."

"मला ती भीति वाटत नव्हती महाराज." मुबारक म्हणाला, "सर्व लोकांच्या समोर मी मेलों होतों. सर्वांच्या देखत मला कबर देण्यांत आली होती.

मला कोण कसं ओळखणार होतं ? ओळख पटली तरीही कुणी ओळख दाखवली नसती. साम्याचा नुसता भ्रम होतो असंच कुणालाही वाटलं असतं. हाच अंदाज असल्यामुळे मी हें धाडस केलं."

राजसिंह म्हणाला, "आतां यापुढं जर माझं उद्दिष्ट मी सिद्ध केलं नाहीं तर तो माझा दोष होईल. या कामगिरीबद्दल मी तुला कोणतं बक्षिस देऊं ?"

"बेहद्दी माफ करा, महाराज." मुबारक म्हणाला, "स्वतः मोगल असतांना मोगल राज्याच्या विध्वंसाला मी हातभार लाविला. स्वतः मुसलमान असतांना हिंदुराज्य स्थापनेचं कार्य केलं. सत्यवादी असतांना खोट बोललों—प्रतारणा केली. बादशहाचं निमक खाऊन मी निमकहरामी केली. या माझ्या सर्व दोषामुळें मला मरणप्राय यातना होत आहेत. यावेळीं कुठलीही बक्षिसी मला नको आहे. यावेळीं आपल्यापाशीं एकच मागणं मला मागायचं आहे—मला तोफेच्या तोंडीं द्या—माझ्या ठिकऱ्या करा. यापुढं जगून रहाण्याची माझी इच्छा नाहीं."

राजसिंहाला फार आश्चर्य वाटलें. तो म्हणाला, "यामुळें जर तुला एवढ्या यातना झाल्या तर असं हें काम तूं कां केलंस ? तसं मला कां सांगितलं नाहींस ? या कामगिरीवर मी दुसऱ्या कुणाला तरी पाठवलं असतं. कुणालाही अशा प्रकारच्या मनोयातना देणं मला मुळींच रुचलं नसतं."

माणिकलालकडे बोट करून मुबारक म्हणाला, "या महात्म्यानं मला नवा जन्म दिला. हें काम मीच करावं अशी याची आंतरिक इच्छा होती. माझ्याखेरीज दुसऱ्या कुणाही माणसाकरवीं हें काम झालं नसतं. कुठल्याही हिंदुच्या शब्दावर मोगलांनीं विश्वास ठेवला नसता. मी अस्सल मोगल होतों म्हणूनच त्यांनीं माझं म्हणणं ऐकलं. ही कामगिरी मी पत्करली नसतो तर कृतघ्नतेचं पाप माझ्या पदरीं पडलं असतं, म्हणूनच मी हें काम पत्करलं. आतां यापुढं मला हा जीव नकोसा झाला आहे. मला तोफेसमोर उभा करून तोफ झाडायला सांगा—किंवा मला कैद करून बादशहाकडे पाठवून द्या—तसं करायचं नसेल तर मी काय वाटेल तें करून या मोगल सैन्यांत सामील होईन आणि तुमच्याबरोबर लढाई देऊन प्राणत्याग करीन."

मुबारकचें तें भाषण ऐकून राजसिंहाला फार आनंद झाला. तो म्हणाला, "मोगल सेनेंत जाऊन सामील व्हायची संधि मी तुम्हाला उद्यां देईन. आज

एकच दिवस थांबा. आणखी एक प्रश्न मला विचारायचा आहे, औरंगजेबानें तुमचा जीव घ्यायचा हुकूम कां दिला ?"

मुबारक म्हणाला, "ती गोष्ट तुमच्यासमोर सांगण्याजोगी नाहीं."

राजसिंह म्हणाला, "आणि माणिकलालच्यासमोर ?"

"मी सांगितली आहे." मुबारक म्हणाला.

राजसिंह म्हणाला, "ठीक आहे. आतां फक्त एकच दिवस वाट पहा."

या मुलाखतीनंतर माणिकलाल मुबारकला एका बाजूला घेऊन गेला त्यानें विचारलें, "साहेब, तुम्हाला जर मरायचंच होतं तर शहाजादीला पकडायला मला कां सांगितलं ?"

मुबारक म्हणाला, "चुकलों सिंहजी, चुकलों ! आतां शहाजादी घेऊन मला काय करायचं आहे ! ज्या सैतानीनं प्रेमाच्या मोबदल्यांत मला सापाच्या डंखाखालीं मरायला लावलं तिच्या कर्माबद्दल तिचं पारिपत्य करावं असं एकदां मला वाटलं होतं. पण माणूस आज जी इच्छा करतो ती उद्यांपर्यंत टिकून रहातेच असं नाहीं. आतां मी जीव द्यायचा निश्चय केला आहे—आतां शहाजादीचं पारिपत्य झालं काय किंवा न झालं काय मला दोन्हीं सारखींच आहेत. आतां यापुढं मला कांहींच नको आहे."

माणिकलाल म्हणाला, "जेबुन्निसेला आतां तुमच्यासाठीं अडकून ठेवण्याची जरुरी नाहीं असं तुम्ही म्हटलंत—आतां बादशहाकडून कांहींतरी वसुली करून मी तिला कां सोडून देऊं नये ?"

मुबारक म्हणाला, "पुन्हां एकदां भेटावं असं वाटतंय मला. धर्मावर तुझा विश्वास आहे कीं नाहीं तें एकदां मी तिला विचारणार आहें. मला पाहतांच तिला काय वाटतं याचं एकदां प्रत्यंतर घ्यायचंच मला—मला पाहतांच तिच्यावर काय परिणाम होतो तोही मला पाह्यचाय."

"म्हणजे अजूनही तुमचं मन तिच्यावर गुनून राहिलंय तर ?" माणिकलालनें विचारलें.

"मुळींच नाहीं." मुबारक म्हणाला, "नुसतं एकदां तिला पाहून घ्यायचं आहे, यापेक्षां मला अधिक कांहीं नको आहे."



# अष्टम खंड

## : १ :

इकडे बादशहा मोठ्या पेंचांत सांपडला होता. त्याची सारी फौज खिडारांत शिरण्याच्या नंतर थोड्याच वेळानें दिवस मावळला, पण तोंपयत खिडाराच्या दुसऱ्या तोंडापर्यंत कुणीच पोंचले नव्हते. त्या बाजूची कांहींच बातमी कळली नव्हती.

संध्याकाळ झाल्यावर त्या चिंचोळ्या खिडींत दाट काळोख पडला. साऱ्या सैन्याला उजेड पुरवितां येईल अशी रोषणाईची कोणतींच सामुग्री त्यांच्याजवळ नव्हती. बादशहा आणि त्याच्या बेगमा यांच्यापुरतीच दिवाबत्तीची सोय होती, पण बाकीची सारी फौज दाट काळोखांत अडकून पडली होती.

आधीच ती पहाडी जागा, त्यांतून चिंचोळी, दोन्ही बाजूचे पर्वताचे कडे दूरवर उंच गेलेले, त्यामुळें सारेंच भयाण वाटत होतें. घोडे टकरा खाऊं लागले होते. कांहीं घोडे तर वरच्या स्वारासकट कोसळून पडले. आणि ते पडणारे घोडे दुसऱ्या घोड्यावर आदळून घोडे आणि स्वार दोघेही जखमी झाले किवा धराशाई झाले.

हत्तीच्या पायांना रस्त्यावरचे दगड लागून ते ठेचाळले तेव्हां बरेचसे हत्ती बेफाम होऊन धांवाधांव करूं लागले. घोड्यावर बसलेल्या बायका खालीं कोसळून पडल्या आणि घोड्याच्या टापाखालीं किंवा हत्तीच्या पायाखालीं सांपडून किकाळ्या ठोकूं लागल्या.

मेणे वाहणाऱ्या भोयांच्या पायांची चाळण झाली होती आणि ते चालायला आणि मेणे वाहून न्यायला असमर्थ झाले होते.

पायदळ फौजेला कूच करणें अशक्य झालें होतें. ते पदोपदीं ठेंचाळत होते आणि त्यांच्या पायांना जखमा होत होत्या.

फौजेची अशी दूरवस्था झालेली पाहून औरंगजेब-बादशहानें मुक्काम ठोकण्याचा हुकूम दिला खरा, पण तंबू ठोकायला जागा कुठें होती ? मोठ्या कष्टानें बादशहा आणि बेगमा यांचें तंबू कसेबसे उभारले गेले. इतर फौजेसाठीं तंबू उभारणें अशक्य झालें. जे जिथें होते तिथेंच ते राहून गेले. स्वार घोड्यावर बसून राहिले, हत्तीवरचे हत्तीवर राहिले आणि पायदळीं जाणारे तसेच उभे राहून वेळ काढीत होते. कित्येकांनीं बाजूच्या डोंगराच्या सुळक्यांत आश्रयाची जागा पाहून पाय सोडून बैटक मारायची कशी बशी व्यवस्था केली होती. ते सुळके चढायला इतके अवघड होते कीं त्याजागीं कुठेंही आसऱ्याला जागा करणें अशक्य होतें. अर्थात् फौजेंतल्या बऱ्याच लोकांना डोकें टेकायला कुठेंच जागा मिळाली नाहीं.

या सगळ्या संकटांत सर्वांत मोठें संकट म्हणजे खाण्याच्या जिनसांचा अभाव. फौजेबरोबर जी कांहीं रसद होती ती सारी रजपूतांनीं लुटून नेली होती. माणसाच्या खाण्याचे जिन्नस तर राहोनच, पण त्या खिडाराच्या अडगळींत घोड्याला गवत किंवा चारा मिळणें देखील अशक्य झालें होतें. सारा दिवस कूच करण्याचे परिश्रम घडल्यानंतर कुणालाही—बादशहा आणि बेगमा यांना सुद्धां—खायला कांहीं मिळालें नाहीं. भूकेतहानेनें सारे व्याकूळ झाले होते. आणि झोंप घेणें अशक्य झाल्यामुळें मृतप्राय झाले होते. अशा रितीनें मोंगलांची ती प्रचंड फौज मोठ्या बिडतींत सांपडली होती.

इकडे बादशहाला उदेपुरी आणि जेबुन्निसा यांना पकडून नेल्याची बातमी कांहीं वेळानें समजली. ती बातमी ऐकतांच तो ज्वालामुखीसारखा भडकून उठला. एकाच माणसानें सारी फौज होती नव्हतीशी करून टाकणें शक्य असतें तर औरंगजेबानें तेंहीं केलें असतें. सिंहिणीला पिंजऱ्यांत पकडलेली पाहून बिळांत अडकलेला सिंह जसा आरोळ्या ठोकतो तसाच औरंगजेब नुसत्या गर्जना करूं लागला.

मध्यान्ह रात्र उलटल्यावर सैन्यांतली ही गडबड बरीचशी मंदावली. त्यावेळीं बऱ्याच दूर अंतरावर पहाडावरचे मोठमोठे वृक्ष कोसळून पडत असल्याचा

आवाज पुष्कळांच्या कानीं आला. तो प्रकार काय होता याचा कुणालाच अंदाज येत नव्हता. वादळ वावटळीनें तसें कांहीं होत असावें अशी कल्पना करून त्या रात्रीं सारे स्वस्थ राहिले.

: २ :

● रात्र संपून पहाट झाली त्यावेळीं औरंगजेबानें फौजेला कूच करायचा हुकूम दिला. ती सारी अफाट फौज स्वार शिबंदी आणि तोफा घेऊन झपाट्यानें खिंडाराच्या पलिकडच्या टोकाकडे जायला निघाली. भूकेतहानेनें सारे व्याकूळ झाले होते. बाहेर पडल्यावर खायला प्यायला मिळेल या आशेनें ते उतावीळ झाले होते आणि म्हणूनच रांगा सोडून अस्ताव्यस्तपणें ते पळ काढूं लागले होते.

उदेपुरी आणि जेबुन्निसा या दोघींची सुटका करून उदयपुरची राखरांगोळी करण्याठीं उतावीळ झालेला औरंगजेब आपल्या क्रोधाग्नींत आपणच पिचत जात होता. त्याच्या उतावीळपणाची आतां अगदीं परमावधी झाली होती.

शक्य तितकी धांवाधांव करून मोगलसेना खिंडाराच्या तोंडाशीं येऊन पोंचली. ते सारे सैनिक खिंडाराच्या तोंडाशी आले त्यावेळीं धमका खाऊन एकदम स्तब्ध झाले. सर्वनाश होण्याचा प्रसंग समोर उभा राहिला होता. खिंडाराचें तोंड बंद झालें होतें.

रात्रीच्या वेळीं रजपूतांनीं असंख्य प्रचंड वृक्ष तोडून पर्वताच्या शिखरावरून खिंडाराच्या तोंडाशीं लोटून टाकले होते. खिंडाराच्या तोंडावर वृक्षाच्या धूडांचा महापर्वत रचला गेला होता आणि त्यामुळें बाहेर पडण्यास वाव राहिला नव्हता. हत्ती घोडे तर दूरच राहोत, पण कोल्ह्याकुत्र्यांना देखील त्या राशींतून वाट काढणें कठिण गेलें असतें.

मोगल सेनेची दाणादाण उडाली. सारे ऊर बडवून ओरडत होते. बायकांच्या हृदयभेदक किंकाळ्या ऐकून औरंगजेबाच्या दगडी काळजाचा देखील थरकांप उडाला.

रस्ता साफ करण्याचें काम ज्यांचें असतें ते फौजेंतले लोक सर्वांच्या पुढें असतात, पण या फौजेला उलट खाऊन खिंडारांत प्रवेश करावा लागल्यामुळें ते

आतां सर्वांच्या शेवटीं गेले होते. औरंगजेबानें या सर्व लोकांना मागल्या रांगेतून पुढें जाण्याचा हुकूम सोडला.

हुकूम सोडला खरा, पण तो तांतडीनें अंमलांत येणें कठिण होतें. खिंडाराच्या मागल्या तोंडाशीं असलेले ते लोक पुढें येण्याची वाट पाहणें म्हणजे त्या दिवशीं साऱ्या फौजेनें उपाशी राहण्याची तयारी करणेंच होतें, म्हणून औरंगजेबानें असा हुकूम दिला, कीं पायदळ सैन्य असो कीं दुसरें कुणी असो, ज्यांना पुढें जाणें शक्य होईल त्या सर्वांनीं पुढें व्हावें आणि झाडांच्या राशींत घुसून ती लोटून देण्याचा उपक्रम करावा. या कामीं त्यानें हत्ती उपयोगांत आणण्याची समज दिली होती.

हजारों हजार पायदळ सेना आणि शेंकडो हत्ती हा कोसळलेल्या झाडांचा कोट कोसळून घालायला सरसावले. तितक्यांत एक चमत्कार झाला. ते सर्व लोक त्या झाडापाशीं येऊन पोंचले त्यावेळीं आकाशांतून गारांची वृष्टी व्हावी त्याप्रमाणें वरच्या पहाडावरून मोठमोठ्या शिळांची वृष्टी सुरू झाली. सारी पायदळ फौज त्या शीळावृष्टीखालीं वाताहत होऊं लागली. कोणाचे हात तुटले तर कुणाचे पाय तुटले, कुणाचें मस्तक तुटलें तर कुणाची छाती फुटली, तर कुणाचें सर्व शरीर शीळेखालीं सांपडून त्याचा चेंदामेंदा झाला.

हत्तींना देखील असाच मार बसत होता. त्या मारानें कुणाचे दांत तुटले तर कुणाच्या सोंडा तुटल्या, तर कुणी शिळेखालीं सारखेच चिरडले गेले. जे हत्ती शाबूत राहिले होते ते किंकाळया फोडीत मागें वळले आणि साऱ्या पायदळ फौजेला पायाखालीं तुडवीत पळ काढूं लागले. औरंगजेबाचें सारेंच सैन्य अशा रितीनें उध्वस्त होऊं लागलें.

सर्वत्रांनीं वर पाहिलें त्यावेळीं त्यांचा थरकांप उडाला. पर्वताच्या शिखरावर हजारों हजार रजपूत पायदळ वारूळांतून बाहेर पडलेल्या मुंग्यांसारखे रांगेनें चाललें होतें. शिळेखालीं न सांपडल्यामुळें जे बचावले होते त्यांना हे वरचें सैन्य वरून गोळया घालीत होतें. अर्थात्, या तोडलेल्या झाडांच्या कोटाच्या तळाशीं औरंगजेबाच्या सैन्यांतल्या एकाही माणसाला येणें अशक्य झालें.

तें पाहतांच औरंगजेबानें सेनापतींना छेडण्यास सुरवात केली. काय वाटेल तें करून तो झाडाचा कोट तोडून काढायचा प्रयत्न करण्याचा हुकूम सोडला.

' दीन दीन ' म्हणून ओरडत सारी मोगलांची फौज पुढें सरसावली—पण पुन्हां शिखरावरच्या रजपूत सेनेच्या शिळेच्या अणि गोळ्यांच्या वृष्टीखालीं त्यांचा चेंदामेंदा उडाला.

मोगल सेना पुन्हां पुन्हां पुढें सरसावण्याचा प्रयत्न करीत होती आणि पुन्हां पुन्हां त्यांची संख्या घटत जात होती किंवा हटत जात होती.

औरंगजेब हताश झाला. पुढें चाल करून जाणें आतां अशक्य आहे असें पाहून त्यानें फौजेला मागें फिरायचा हुकूम सोडला. खिंडाराच्या ज्या तोंडांतून फौजेनें आंत प्रवेश केला त्याच द्वारानें बाहेर पडणें भाग होतें. सारी सेना भूकेतहानेनें आणि थकव्यानें मृतप्राय झाली होती. उभ्या जन्मांत औरंगजेबाला भूकेतहानेचा कोप हा पहिल्यानेंच अनुभवायला मिळाला. बेगमांचीही तीच अवस्था झाली होती.

पण आतां दुसरा कांहीं उपाय नव्हता. पर्वताच्या सुळक्यावरून वर चढून जाणें अशक्य होतें. आतां मागें परतण्याखेरीज दुसरा उपाय नव्हता.

दुपार टळून गेली तेव्हां ते ज्या दारानें आंत शिरले होते त्या दाराशीं पुन्हां येऊन पोंहोंचले. पुन्हां त्या सर्वांना जोराचा धक्का बसला. तिथेंही प्रत्यक्ष मृत्यू सारें सैन्य गिळून टाकण्यासाठीं जबडा पसरून राहिला होता. या दाराशींही तशीच तोडलेल्या झाडांची पर्वतप्राय रास रचली होती आणि पर्वतावरही तशीच हातीं बंदूका घेऊन रजपूत सेना रांगेंत उभी राहिली होती. पुढें पाऊल टाकायला आतां कुठेंच जागा नव्हती.

पण त्या खिंडारांतून बाहेर पडल्याखेरीज गत्यंतर नव्हतें. तिथून बाहेर पडतां आलें नाहीं तर सर्वत्रांना त्या खिंडारांत अन्नपाण्यावांचून मरावें लागलें असतें. औरंगजेबानें सर्व सेनापतींना बोलावून घेतलें. त्यानें त्यांची केव्हां स्तुती केली, केव्हां विनवणी केली, केव्हां उत्साह दिला, तर केव्हां जरब दाखवून खिंडाराचा रस्ता मोकळा करून घेण्यासाठीं प्रत्यक्ष प्राणदेखील देण्याचें वचन त्यानें त्यांजकडून घेतलें.

पुन्हां सारे सेनापती फौज घेऊन झाडाचा कोट तोडायला प्रवृत्त झाले.

यावेळीं आणखी एक सोय झाली होती. रस्ता साफ करणारी फौज याच तोंडाशीं होती. कांहीं झालें तरी मरण टळत नाहीं असें पाहून जिवावर उदार

होऊन ती फौज झाडें तोडण्यासाठीं मोठ्या आवेशानें पुढें सरसावली; पण ती एक क्षणभरच. पर्वताच्या शिखरावरून गोळ्यांची आणि दगडांची वृष्टी सुरू झाली. मुसळधार पावसांत शेतें ज्याप्रमाणें बुडून जातात त्याप्रमाणें मोंगलांचें सैन्य त्या वर्षावाखालीं साफ बुडून गेलें.

संकटामागून संकटें येऊं पहात होतीं. समोरच्याच टेकाडावर राजसिंहाची छावणी होती. मोगल सैन्य मागें फिरत आहे असें त्यानें जेव्हां दुरून पाहिलें, त्यावेळीं त्यानें तोफा सज्ज करून पुढें पाठवल्या.

राजसिंहाची तोफ बोलली. झाडांचा कोट ओलांडून राजसिंहाच्या तोफेंतले गोळे पलिकडच्या सैन्यांत जाऊन पडूं लागले. त्या गोळ्यांच्या वर्षावाखालीं हत्ती, घोडे, पायदळ सेनापतीसकट जमीनदोस्त होऊन गेले.

मोगलसेना खिंडारांत मागें हटली. आगीच्या भयानें क्रूर सर्प वेटोळें करून ज्याप्रमाणें बिळांत लपतो त्याप्रमाणें मोगलसेना एकत्र गोळा होऊन खिंडाराच्या दाराआड लपून राहिली.

शहानशहा बादशहा औरंगजेबानें आपला हिरेजडित पांढरा फेटा मस्तकावरून काढून फेंकून दिला आणि गुडघे टेकून खालीं बसून तो मस्तक बडवून घेऊं लागला. रजपूत भुइखांच्यासमोर दिल्लीचा बादशहा आपल्या सैन्यासकट, उंदरासारखा पिंजऱ्यांत अडकून पडला होता. एक घांसभर अन्न मिळण्यासाठीं तो व्याकूळ झाला होता.

प्रसंग मोठा बिकट आला होता. औरंगजेबाला आठवण झाली, आतां आश्रयाचें एकच स्थान—ती रजपूताची बेटी त्याला आठवली—तिची सांगीही आठवली—निर्मलकुमारीनें दिलेलें कबूतर औरंगजेबानें आकाशमार्गें सोडून दिलें.

: ३ :

● **उदेपुरी** बेगम आणि जेबुन्निसा यांना योग्य जागीं राहण्याची व्यवस्था करून निर्मलकुमारी महाराणी चंचलकुमारीपाशीं गेली. तिला प्रणाम करून झालेली सर्व हकिकत तिनें निवेदन केली. ती हकिकत ऐकून घेतल्यावर चंचलकुमारीनें आधीं उदेपुरीला बोलावून घेतलें.

उदेपुरी येतांच चंचलकुमारीनें तिला उत्थापन दिलें आणि वेगळ्या आसनावर बसवून घेतलें. तिथें येतांना उदेपुरी अगदीं खिन्न झाली होती. पण चंचलकुमारीचें सौजन्य पाहून तिला कौतुक वाटलें. मुसलमानांच्या समोर क्षुद्र हिंदु भीतीनें सौजन्य दाखवतात असा समज तिनें करून घेतला होता. ती चंचलकुमारीला म्हणाली, “मोंगलांच्या हातून मरण यावं अशी इच्छा कां धरतां तुम्ही ?”

चंचलकुमारी थोडीशी हंसली आणि म्हणाली, “त्यांच्या हातून मरायची इच्छा कां धरूं आम्ही ? तें मृत्युचं दान आम्हाला द्यावं म्हणून मोगल आले होते, पण आम्ही हिंदू आहों, यवनाच्या हातचं दान आम्ही घेत नाहीं, हें ते विसरले.”

उदेपुरी तिटकारून म्हणाली, “उदेपुरचे भूमिजन आज कित्येक वर्षे मुसलमानांच्या हातून हें दान घेताहेत. सुलतान अल्लाउद्दिनची गोष्ट सोडून द्या, पण अकबरशहा आणि त्याचा नातू यांच्या हातून राणा राजसिंहाच्या वाडवडिलांनीं हेंच दान स्वीकारलं होतं.”

चंचल म्हणाली, “बेगमसाहेबा, आपण चुकतांहां. तें दान नव्हतं. आम्ही तें ऋण म्हणून घेतलं होतं. अकबर बादशहाचं तें ऋण प्रतापसिंहानं स्वतः फेडलं. आपल्या सासऱ्याचं तें ऋण फेडायच्या उद्योगाला आज आम्ही लागलों आहों. त्याचा पहिला हप्ता देण्यासाठीं आम्ही आपल्याला इथं आणलं आहे. माझा हुक्का थंड पडला आहे. कृपा करून तेवढा भरून देतां का मला ?”

चंचलकुमारीनें बेगमेला पहिल्यानें सौजन्यानें वागवलें होतें, तीही तशीच वागली असती तर हा अपमानाचा प्रसंग तिच्यावर आला नसता. तिनें कठोर भाषेनें तेजस्वी अशा चंचलकुमारीच्या अभिमानाला डिवचलें. अर्थात् त्याचें फळ तिला भोगावें लागलें.

यावेळीं बेगमेला चंचलकुमारीच्या पत्राची आठवण झाली. त्या पत्रांत तिनें हीच मागणी केली होती. उदेपुरीच्या सर्वांगाला दरदरून घाम सुटला, तरीही नित्य अंगवळणी पडलेल्या अभिमानाला पुन्हां जागवून ती म्हणाली, “बादशहाची बेगम हुक्का भरून देत नसते.”

चंचलकुमारी म्हणाली, " ज्यावेळीं तूं बादशहाची बेगम होतीस, तेव्हां हुक्का भरून देत नव्हतीस. आतां तूं माझी बादी आहेस. माझा हुकूम आहे— हुक्का भरून दे."

उदेपुरीचा रडें कोसळलें—दुःखानें नव्हे, रागानें ती म्हणाली, " अलमगीर बादशहाच्या बेगमेला हुक्का भरून सांगण्याइतकी ही मिजास कां आली तुला ?"

चंचल म्हणाली, " उद्यां खुद्द अलमगीर बादशहादेखील इथं येऊन महाराण्याचा हुक्का भरून देईल. त्याला जर ही कला अवगत नसली तर उद्यां तुला ती त्याला शिकवावी लागेल, म्हणून आज स्वतः शिकून घे."

चंचलकुमारीनें दासीला हुकूम केला. " हिच्याकडून हुक्का भरून घे."

उदेपुरी उठली नाहीं.

दासी म्हणाली, " घे ती चिलीम हातांत !"

तरीही उदेपुरी उठली नाहीं असें पाहून दासी तिचा हात धरून तिला उठवायला गेली. दासीच्या हातून आपला पाणउतारा होईल या भीतीनें धडधडत्या काळजानें ती शहानशहाची आवडती बेगम चिलीम उचलायला गेली, पण आसनावरून उठल्यावर एक दोन पावलें टाकलीं नाहींत तोंच थरथर कांपत जमिनीवर कोसळून पडली. दासीनें तिला सांवरलें त्यामुळें तिला आघात लागला नाहीं. उदेपुरी मूर्च्छित होऊन जमिनीवर पडली.

चंचलकुमारीनें हुकुम केल्यावरून दासीनें तिला उचलून तिच्या पलंगावर ठेवलें आणि उपचार करायला सुरवात केली.

थोड्याच वेळांत ती शुद्धीवर आली. यापुढें बेगमेचा कोणत्याही प्रकारें कुणीही उपमर्द करूं नये, तिच्या जेवणाखाण्याची आणि सेवा शुश्रूषेची व्यवस्था राणीच्या तोलानेंच करावी, असें चंचलकुमारीनें निर्मलला सांगितलें.

निर्मल म्हणाली, " तें सारं कांहीं होऊन जाईल, पण तेवढ्यानं तिचं समाधान होणार नाहीं."

" मग तिला हवं आहे तरी काय ?" चंचलनें विचारलें.

" तिला हवी आहे दारू !" निर्मल म्हणाली, " आणि ती कांहीं इथं मिळायची नाहीं."

" दारू का ? " चंचल म्हणाली, " तिनं दारू मागितली तर तिला गोमुत्र पाजा. "

या नव्या व्यवस्थेमुळें उदेपुरी खूष झाली होती, पण रात्र झाली तशी ती अस्वस्थ झाली. निर्मलकुमारीला बोलावून घेऊन ती काकुळतीला येऊन म्हणाली, " इमलीबेगम, थोडा शराब हुकुम कीजिये ! "

" देतें हं ! " असें म्हणून निर्मलनें राजवैद्यांना गुपचुप सांगून पाठवलें. राजवैद्यानीं एक थेंबच औषध पाठवून देऊन सांगितलें, कीं सरबत तयार करून त्यांत तें थेंबभर औषध टाकायचें आणि ती मागेल त्यावेळीं तिला तें द्यायचें. निर्मलनें तसेंच केलें.

उदेपुरीनें तें सरबत घेतलें तेव्हां तिला फार आवडलें. ती उद्गारली, " फार सुंदर दारु आहे ही ! "

थोड्याच वेळांत तिला कैफ चढला आणि ती गाढ झोंपीं गेली.

## : ४ :

● **जेबुन्निसा** एकटीच बसून रहात होती. एक दोन दासी तिच्या दिमतीस दिल्या होत्या. निर्मलकुमारी मधून मधून येऊन तिची खबर घेत असे.

उदेपुरीची भानगड तिला हळूहळू कळली, ती ऐकून तिला स्वतःबद्दल काळजी वाटूं लागली.

शेवटीं निर्मलकुमारी तिलाही घेऊन चंचलकुमारीपाशीं गेली. विनीत नव्हे कीं गर्विष्ठही नव्हे, अशा रुबाबानें ती चंचलकुमारीपाशीं येऊन हजर झाली. आपण अलमगीर बादशहाची कन्या आहें, हें कांहीं केल्या विसरायचें नाहीं हें तिनें आपल्या मनाशीं ठरवलें होतें.

चंचलकुमारीनें तिला मोठ्या आदरानें स्वागत करून उच्चासनावर बसवलें आणि ती तिच्याशीं सामान्य भाषण करूं लागली. जेबुन्निसाही तितक्याच सौजन्यानें तिला उत्तरें देत होती. परस्परांबद्दल कटुता निर्माण होईल अशा प्रकारें त्या दोघीही कांहीं बोलल्या नाहींत. चंचलकुमारीनें आपल्यासारखींच तिची व्यवथा ठेवण्याचा हुकूम तिच्यासमोर देऊन तिला अत्तरगुलाब आणि पान दिलें.

अशा रीतीनें बोळवणी केली तरी जेबुन्निसा उठली नाहीं. ती म्हणाली, “ महाराणी, आम्हाला इथं कां आणण्यांत आलंय तें सांगाल का मला ? ”

चंचलकुमारी म्हणाली, “ तें कारण आपल्याला स्पष्ट करून सांगतां येत नाहीं. आमच्या एका ज्योतिष्याच्या आदेशाप्रमाणें आपल्याला आणण्यांत आलं आहे. आपण आज आपल्या खोलींत एकट्याच शयन करा. दार उघडं ठेवा. पहारेकरी दूर राहून पहारा ठेवतील. आपल्याला कांहीं त्रास होणार नाहीं. आपल्याला आज रात्रीं एक महत्त्वाचं स्वप्न पडेल असं आमच्या ज्योतिष्यानं सांगितलं आहे. असं स्वप्न जर पडलं तर उद्यां आम्हाला तें सांगा, एवढंच माझं मागणं आहे. ”

जेबुन्निसा तें ऐकून चिंतित झाली. तिनें चंचलकुमारीचा निरोप घेतला. निर्मल-कुमारीनें तिची व्यवस्था दिल्लीच्या थाटांत ठेवली होती.

जेबुन्निसा बिछान्यावर आडवी झाली पण तिला झोंप येईना. चंचलकुमारीनें सांगितल्याप्रमाणें तिनें दार उघडें ठेवलें होतें. ती एकटीच झोंपली होती. चंचलकुमारीची आज्ञा मानली नाहीं तर ती उदेपुरीसारखाच आपला पण अपमान करील असें तिला वाटत होतें. तरीपण सारी रात्र कुणाची सोबत नसतांना एकट्यानें झोंप घेणें तिला भीतिदायक वाटत होतें. रात्रीच्यावेळीं आपल्याला एकटेंच गांठून कुणीतरी अत्याचार करावा अशीही योजना केली असेल, अशी तिला शंका आली. एवढ्यासाठीं कांहीं झालें तरी झोंपी जायचें नाहीं असें ठरवून ती बळेंच जागत राहिली.

तिनें असा निश्चय केला होता खरा पण तो पाळणें तिला कठीण जात होतें. मधून मधून तिच्या डोळ्यावर झांपड येत असे, पण बळेबळेंच प्रयत्न करून ती डोळे उघडे ठेवीत असे. मधून मधून तिला झांपड येत होती आणि मधून मधून जागही येत होती.

तिला जाग येई त्यावेळीं तिला आपल्या परिस्थितीची आठवण होई. कुठें दिल्लीचीं बादशहाजादी आणि कुठें उदयपुरची बंदिनी ! कुठें मोगल बादशाहीच्या रंगभूमीवरची मुख्याभिनेत्री, मोगल बादशहीच्या आकाशां-तील चंद्रिका, तख्त ए ताऊसची अत्यंत उज्ज्वल हिरकणी, काबुलपासून विजापूर गोवळकोंड्यापर्यंतचा प्रदेश ज्याच्या बाहूबलाखालीं आलेल ?

त्याची उजवा हात,—आणि कुठं आज कडी कपाटांतल्या उदयपुरच्या पिंजऱ्यांत उंदरासारखी अडकून पडलेली, रूपनगरच्या भूमीजनाच्या मुलीची बंदिनी, हिंदुच्या घरीं अस्पृश्य ठरलेली डुकरी, हिंदु दासींच्या पायाखालीं सांपडलेली कींडमुंगी—यापेक्षां मरण बरं नाहीं का ? मरण कां येऊं नये ?—प्राणाहून प्रिय अशा मुबारकला जें दिलें तें बरेंच नव्हे तर काय ? मुबारकला जिनें मरणाची देणगी दिली ती स्वतः मरायला योग्य कां नव्हे ? 'हाय हाय मुबारक ! मुबारक ! मुबारक ! तुझं अमूप वीरत्व एका सामान्य सापाच्या विषावर विजय मिळवायला कां समर्थ झालं नाहीं ? ती सर्वांगसुंदर मनोहर मूर्ति सापाच्या विषानं निळी काळी पडली होती का ? या कालभुजंगीला दंश करायला या उदयपुरांत तसा कुणी साप नाहींच का ? मानवी नागीण विषारी नागिणीच्या दंशानं नाहींच का मरणार ? हाय मुबारक ! मुबारक ! मुबारक ! असा माझ्यापुढं मूर्तिमंत उभा रहा आणि एक नागीण आणून तिच्याकडून मला दंश करायला लाव आणि मी मरतें कीं नाहीं तें पाहा !'

मुबारकच्या दर्शनाला आतुर होऊन जेबुन्निसेनें डोळे उघडले. पहातें तो समोर प्रत्यक्ष मुबारक उभा.

एक किंकाळी फोडून जेबुन्निसेनें पुन्हां डोळे मिटले. तिला मूर्च्छा आली.

: ५ :

● **दुसऱ्या** दिवशीं सकाळीं जेबुन्निसा शयनगृहांतून बाहेर आली तेव्हां तिचें स्वरूप पूर्णपणें पालटलें होतें. या बंदिवासांत पडल्यापासून आधींच ती थकली होती, जर्जर झाली होती, पण आतां तिची काय दशा झाली होती तें सांगता आलें नसतें. रात्रंदिवस आगीच्या खाईजवळ जर कुणी बसून राहिला, किंवा जळत्या चितेवर नुसता भाजून बाहेर आला, तर त्याची जी स्थिति होईल तशीच जेबुन्निसेची दशा झाली होती. क्षणाक्षणाला ती जळून पिचून निघत होती.

मोठ्या नाखुषीनें वेणीफणी करून तिनें नित्याप्रमाणें फलाहार केला. त्यानंतर ती उदेपुरीला भेटायला गेली. उदेपुरी एकटीच बसली होती. तिच्यासमोर कुमारी मेरी आणि क्रॉसवरची येशुची मूर्ति होती. बरेच दिवस उदेपुरी येशु

आणि त्याच्या आईला विसरली होती. या संकटाच्या वेळीं तिला त्यांची आठवण झाली.

जेबुन्निसा आली त्यावेळीं उदेपुरीच्या डोळयांतून आसवांच्या धारा लागल्या होत्या. तिच्या गालावरून आसवांचे ओघळ सारखे वहात होते.

जेबुन्निसेनें उदेपुरीला पाहिलें तेव्हां तिला ती अत्यंत सुंदर वाटली. यापूर्वी ती इतकी सुंदर कधींच दिसली नव्हती. ती जात्याच सुंदर होती खरी, पण मत्सराच्या झळीमुळें आणि व्यसनांच्या प्रभावामुळें तिचें सौंदर्य यापूर्वी विकृत झालें होतें. आज आसवांच्या ओघळामुळें ती विकृति धुतली जाऊन तिच्या सौंदर्याचा पूर्ण विकास झाला होता.

जेबुन्निसेला पाहतांच उदेपुरीनें आपलें रडगाणें सुरू केलें. ती म्हणाली, " मी बाँदी होतें—बाँदीच्याच मोलानें विकली गेलें होतें—तशीच बाँदी का राहिलें नाहीं मी ? ऐश्वर्य भोगायचं कां आलं माझ्या नशिबीं ? "—एवढेंच बोलून उदेपुरीनें जेबुन्निसेकडे पाहिलें आणि म्हटलें, " असं काय झालं आहे तुला ? काल कांहीं विशेष झालं का ? या काफरांनीं तुझ्यावर कांहीं अत्याचार केले का ? "

एक मोठा सुस्कारा सोडून जेबुन्निसा म्हणाली, " काफर काय करतात मला ? काय केलंय ते अल्लानं ! "

" सारं कांहीं तोच करतो. " उदेपुरी म्हणाली, " पण असं झालंय तरी काय ? "

" तें कांहीं सांगतां येत नाहीं मला. मरायच्या वेळीं सांगेन. "

" कांहीं कां असेना—ईश्वरानं या रजपूतांना चांगलीच शिक्षा लावली पाहिजे त्यांच्या घमेंडीसाठीं. "

" यांत रजपूतांचा कांहीं दोष नाहीं." असें म्हणून जेबुन्निसा उगीच राहिली. उदेपुरीहीं कांहीं बोलली नाहीं. थोड्या वेळानें चंचलकुमारीला भेटण्याचा तिनें उल्लेख केला तेव्हां उदेपुरी म्हणाली, " कां ? तुला बोलावलंय का तिनं ? "

" नाहीं. "

" मग आपण होऊन तिला भेटायला जाऊं नकोस. तूं बादशहाची कन्या आहेस. "

" माझं स्वतःचंच कांहीं जरूरीचं काम आहे तिच्यापाशीं."

उदेपुरी म्हणाली, " तिची जर भेट झाली तर तिला एक प्रश्न विचार—तिला म्हणावं, कीं किती अश्रफी दिल्या म्हणजे हे गंव्हार आम्हाला सोडून देतील ?"

" विचारीन." असें म्हणून जेबुन्निसेनें तिचा निरोप घेतला.

ती चंचलकुमारीला भेटायला गेली त्यावेळीं पूर्वीप्रमाणेंच तिनें तिचा आदर-सत्कार केला आणि त्यांची खुशाली विचारली. ती म्हणाली, " कसं काय ? काल झोंप चांगली लागली ना ?"

" नाहीं." जेबुन्निसा म्हणाली, " तुम्ही सांगितलं होतं तसं करण्याच्या पायीं भीतीनं मी झोंपलें नाहीं."

" मग कांहीं स्वप्न नाहीं का पडलं ?"

" स्वप्न नव्हे—प्रत्यक्षच पाहिलं कांहीं !"

" बरं कीं वाईट ?"

" बरं कीं वाईट तें सांगतां यायचं नाहीं—बरं तर नव्हेच—पण त्या बाबतींत तुमच्यापाशीं माझं कांहीं मागणं आहे."

" सांगा ना !"

" पुन्हां तें तसंच दिसेल का मला ?"

" ज्योतिष्याला विचारल्याशिवाय तें मला सांगतां यायचं नाहीं." चंचलकुमारी म्हणाली, " पांच सात दिवसांनीं मी त्या ज्योतिष्याकडे माणसं पाठवतें."

" आज नाहीं का पाठवतां यायचं कुणी ?"

" एवढी घाई कसली आली आहे, बादशहाजादी ?"

" घाई कसली तें काय सांगू ?" जेबुन्निसा म्हणाली, " याच क्षणाला तें दृश्य जर मला दाखवाल तर जन्मभर मी आपली बाँदी होऊन राहीन."

" मोठं आश्चर्य आहे !" चंचलकुमारी म्हणाली, " असं हें आहे तरी काय ?"

जेबुन्निसेनें त्यावर उत्तर दिलें नाहीं. तिच्या डोळ्यांतून आसवें गळत होतीं, ती पाहून देखील चंचलकुमारीला तिची दया आली नाहीं. ती म्हणाली, " पांच सात दिवस वाट पहा—मी विचार करून पाहीन."

त्यावेळीं जेबुन्निसा हिंदुमुसलमान हा भेद विसरली. जिथें जाऊं नये तिथें गेली. ज्या बैठकीवर चंचलकुमारी बसली होती तिथें जाऊन कोसळलेल्या वेलीप्रमाणें तिनें तिच्या पायावर लोटांगण घेतलें. चंचलकुमारीच्या पायावर डोकें ठेवून डोळ्यांतल्या आंसवांनीं तिनें तिचे पाय भिजवून टाकले. ती उद्गारली, " माझं रक्षण करा ! माझं रक्षण करा ! नाहींतर आज मी मरेन. "

चंचलकुमारीनें तिला उठवून आपल्या शेजारीं बसवून घेतलें. हिदु मुसलमान हा भेद तीही विसरून गेली होती. ती म्हणाली, " शहाजादी, काल रात्रीं जशा दार उघडं ठेऊन तुम्ही झोपीं गेलां होतां, आजही तसंच करा. आपली मनकामना आज निश्चित पुरी होईल. " असें म्हणून तिनें जेबुन्निसेला निरोप दिला.

इकडे उदेपुरी जेबुन्निसेची वाट पहात होती, पण जेबुन्निसा तिला पुन्हां भेटायला गेली नाहीं. निराश होऊन उदेपुरीनें स्वतःच चंचलकुमारीची भेट घेतली.

भेट झाली त्यावेळीं उदेपुरीनें चंचलकुमारीला विचारलें, " किती अश्रफी मिळाल्या म्हणजे तुम्ही आम्हाला सोडून द्याल ? "

चंचलकुमारी म्हणाली, " बादशहानं जर भारतवर्षांतल्या साऱ्या मशिदी, दिल्लींतल्या जुम्मा मशिदीसह कोसळून घातल्या, मयूरसिंहासन स्वतः आणून इथं पोचतं केलं आणि प्रतिवर्षी आम्हाला खंडणी देण्याची कबुली दिली तरच तुम्हा लोकांना सोडण्यांत येईल. "

उदेपुरी रागानें बेभान होऊन गेली. ती उद्गारली, " गंव्हार गांवढळांच्या अंगीं एवढी मिजास कुठून आली ? " असें म्हणून उदेपुरी उठून जाऊं लागली. त्यावेळीं चंचलकुमारी हंसली अन् म्हणाली, " परवानगी घेतल्याशिवाय निघालीस कुठं ? गंव्हार गांवढळाची तूं बांदी आहेस हें विसरलीस वाटतं ?—" एका दासीला बोलावून घेऊन चंचलकुमारी म्हणाली, " या आमच्या नव्या बांदीला साऱ्या राणीवशांत नेऊन फिरून, सर्वांना दाखवून ये पाहूं. त्यांना म्हणावं, ही दारा सेकोची बाजारांत विकत घेतलेली बांदी आहे."

उदेपुरी रडत रडत त्या दासीबरोबर निघाली. दासीनें तिला—औरंगजेबाच्या त्या आवडल्या बेगमेला—साऱ्या राणीवशांत फिरवून आणलें.

थोड्या वेळानें निर्मल आली तेव्हां ती चंचलकुमारीला म्हणाली, "महाराणी, मुद्याची गोष्ट विसरतेस कशी? उदेपुरीला पकडून आणली ती कशासाठी? ज्योतिष्याचं भविष्य ध्यानांतच नाहीं का तुझ्या?"

चंचलकुमारी हंसून म्हणाली, "मी विसरलें नाहीं तें. पण त्या दिवशीं ती बेगम इतकी खचल्यासारखी झाली होती, कीं तिच्यावर ज्यास्त जबरदस्ती करणं मला कठिण गेलं. त्यावेळीं हिची मला दया आली, पण आतां तो दयेचा झरा तीच आटवून टाकते आहे."

: ६ :

● अर्धी रात्र उलटून गेली होती. सारे झोंपीं गेले होते. जिकडे तिकडे सामसूम झालें होतें. बादशहाची मुलगी सुखशय्येवर पहुडली होती तरीही आसवें गाळत होती. मधून मधून चिडलेल्या वाघिणीसारखी उसळून उठत होती, पण लगेच बाण लागलेल्या हरणीसारखी घायाळ होऊन पडत होती.

ती रात्र मोठी भयंकर होती. मधून मधून हुंकार देत सोसाट्याचा वारा वहात होता. आकाश भरून आलें होतें. खिडकींतून पाहिलें तर समोरच्या डोंगराच्या शिखरापर्यंत काळोख पसरलेला दिसत होता. रजपूतांच्या शिबिरांत मात्र वसंतांतल्या बागेंत फुललेल्या फुलांसारखे एकाच जागीं दिवे झगमगत होते. बाकी सर्वत्र काळोखाचें साम्राज्य पसरलें होतें.

क्वचित् पहारेकऱ्याची ललकारी किंवा बंदुकीचा आवाज ऐकूं येत होता. क्वचित् तोफेचा एकच आवाज गिरीकंदरांतून पडसाद देत मेघाच्या गडगडाटासारखा निनादत होता. तबेल्यांतले घोडे तो आवाज ऐकून घाबरून खिंकाळत होते.

अशा वेळीं त्या भयंकर रात्रीच्या निस्तब्धतेचा भंग करणारे ते मधून मधून उठणारे आवाज ऐकत खिन्न मनानें जेबुन्निसा विचार करीत होती; "कुठली ही तोफ? मोगलांचीच का? मोगलांच्या तोफेखेरीज असा जबर आवाज कसा येईल? माझ्या बापाघरच्या तोफेनं ती हांक फोडली— अशा शेंकडो तोफा आहेत माझ्या बापापाशीं—त्यांतली एकादी नाहीं का भिडायची या माझ्या हृदयाशीं? तोफेच्या तोंडीं उभं राहून त्या गोळ्याबरोबर

ठिकऱ्या उडाल्या म्हणजे या हृदयांतली पेटती आग नाहीं का थांबायची! काल मी हत्तीवर बसलें. समोर लाखों लाखांचें सैन्य पहात होतें, लाखो शस्त्रांचा झंकार ऐकत होतें, त्यांतल्या एकाद्या शस्त्रानं माझ्या या हृदयांतली आग नसती का शमवली? कां कुणी असं करून पाहिलं नाहीं? मी हत्तीवर बसलें होतें, खालीं उडी टाकून हत्तीच्या पायाखालीं तुडवून घेऊन मला मरतां आलं असतं!—कां बरं?—कां बरं मी तसं करून पाहिलें नाहीं? मरावंसं वाटतंय पण मरायचा उपाय कां केला नाहीं? हिऱ्यामाणकाचे दागिने आज माझ्या अंगावर आहेत त्यांतला एक हिरा खाऊन मी कां मेलें नाहीं? मरायचा उपाय करायचं सामर्थ्य माझ्या अंगीं नाहीं हेंच खरं—"

इतक्यांत सोसाट्याचा वारा आला. मोकळ्या दारांतून वाऱ्याचा झोत आंत आल्यामुळें तिथले दिवे मालवले गेले. खोलींत काळोख होतांच जेबुन्निसेच्या मनांत भीतीचा संचार झाला—तरीही ती म्हणत होती, "भ्यायचं कां? आतांच मरण यावं असं म्हणत होतें ना मी? मरायलाच जें माणूस तयार झालंय त्याला भीती कशाची?—भीती?—मेलेलं माणूस काल प्रत्यक्ष पाहिलं तरी आज जिवंत आहें. मेलेलीं माणसं जिथं जातात तिथंच जावंसं वाटतंय ना? मग भ्यायचं कशाला? माझ्या नशिबीं कांहीं बेहेस्त नाहीं—जहान्नुममध्यें जावं लागेल म्हणूनच का ही भीती वाटते? आजवर कधीं असल्या गोष्टींवर विश्वास ठेवला नाहीं. जहान्नम नाहीं कीं बेहस्तही नाहीं! खुदा मानला नाहीं कीं दीनही ओळखला नाहीं. ओळख होती काय ती भोगविलासाची. अल्ला रहीम! कां एवढं ऐश्वर्य दिलंस मला? या ऐश्वर्यामुळं माझं जीवन विषमय झालं. तुझी ओळख मला पटली नाहीं. ऐश्वर्यात सुख नाहीं हें मला कळत नव्हतं, पण तुला तर कळत होतं ना? कळून सवरून असा निर्दय कां झालास? कां मला असं दुःख दिलंस? एवढं मोठं ऐश्वर्य कुणाच्या नशिबीं कधीं लिहिलं होतं का? अन् माझ्यासारखं दुःखी दुसरं कुणी असेल का?"

बिछान्यावर कुठं तरी मुंगी किंवा ढेकूण होता.—रत्नखचित पलंगावरच्या परांच्या गाद्यांत जायला ढेकणाला बंधन नसतें—तो ढेकूण जेबुन्निसेला डसला. ज्या नाजूक देहावर फुलांचे बाण फेकायला देखील पुष्पधन्वा मदन काचरत असे, त्याच देहाला डसून त्यानें रक्त बाहेर काढलें. त्या दंशानें जेबुन्निसा थोडीशी

अस्वस्थ झाली. ती आपल्याशींच हंसुन म्हणाली, "ढेकूण, मुंगी डसली तर मी अस्वस्थ होतें—मन अनंत दुःखानं व्याकुळ झालं असतांही अस्वस्थ होतें—तेवढा हा ढेकणाचा डंख मला सहन झाला नाहीं आणि प्राणाहून प्रिय असलेल्या माणसाला अगदीं सहज—अगदीं खेळीमेळीनं—मी सापाचा डंख अनुभवायला पाठवून दिलं. मलासुद्धां असा विषारी साप कुणी नाहीं का आणून द्यायचा ? एक साप तरी द्या किंवा मुबारक तरी द्या ! "

मानसिक यातना अनावर झाली आणि त्यावेळीं माणूस एकटेंच पडलें, तर त्यावेळीं मनांतल्या गोष्टी हळूहळू बाहेर येऊं लागतात. मौनाला वाचा फुटते. मनाच्या आवेगाच्या भरांत त्या मिट्ट काळोखांत सोसाट्याच्या वाऱ्याच्या हुंकाराचा भेद करून ती जणूं काय कुणाला तरी उद्देशून मोठ्यानें बोलली, 'एक साप तरी द्या किंवा मुबारक तरी द्या.'

त्या काळोखांतून कुणीतरी उत्तर दिलें, "मुबारक मिळाला तर मग नाहीं ना तूं मरणार ? "

"कोण बोललं तें ? " असें म्हणून जेबुन्निसा पांघरूण फेंकून उठून बसली. ती म्हणाली, "हें काय हें ? काय ऐकतें आहें मी ? कुणाचा हा आवाज ? "

उत्तर आलें, "कुणाचा ? "

जेबुन्निसा म्हणाली, "कुणाचा ? बेहेस्तांत गेलेल्याला बोलतां येतं का ? नुसती छायाच नव्हे का ही ? तूं बेहेस्तांतून येतो आहेस—जातो आहेस—हें कसं झालं मुबारक ? काल तूं मला दिसलास—आज तुझ्या तोंडचा शब्द मी ऐकला.—तूं मेला आहेस कीं जिवंत आहेस ? असीरउद्दिननं मला फसवलं का ? तूं जिवंत ऐस कीं मेलेला ऐस, अगदीं माझ्याजवळ-माझ्या या पलंगावर तूं एक क्षणभर नाहीं का बसणार ? तूं जरी छायास्वरूप असलास तरीदेखील मला भीति वाटायची नाहीं—जरा बैस ना इथं."

उत्तर आलें, "कशाला ? "

जेबुन्निसा काकुळतीला येऊन म्हणाली, "मला कांहीं बोलायचं आहे—आजवर जें कधीं बोललें नाहीं तें बोलायचं आहे."

तो मुबारक होता—काळोखांत ज्यावेळीं तो जेबुन्निसेच्या शेजारीं पलंगावर बसला, जेबुन्निसेच्या बाहुला त्याच्या बाहूचा स्पर्श झाला, त्यावेळीं जेबुन्निसेच्या

सर्वांगावर आनंदाचे रोमांच उभे राहिले. तिचें अंतःकरण आनंदानें नाचूं लागलें. त्या काळोखांत तिच्या कपाळावरून मोत्यासारखे घामाचे थेंब टपटप खालीं पडूं लागले.

जेबुन्निसेनें मोठ्या आदरानें मुबारकचा हात आपल्या हातांत धरला आणि म्हटलें, " तूं छाया नाहींस, प्राणेश्वरा ! वाटेल तें सांगून मला फसवायचा प्रयत्न केलास तरी मी फसणार नाहीं. मी तुझीच आहें—आतां तुला मी हातचा सोडणार नाहीं !—" असें म्हणून जेबुन्निसा एकदम पलंगाखालीं उतरली आणि मुबारकचे दोन्ही पाय धरून म्हणाली," मला क्षमा कर. ऐश्वर्याच्या कैफानं मी पागल झालें होतें. आज शपथेवर सांगतें, मी हें ऐश्वर्य झुगारून देईन ! तूं मला क्षमा केलीस तर मी फिरून दिल्लीला जाणार नाहीं. सांग—तूं जिवंत आहेस ना ? "

एक मोठा सुस्कारा सोडून मुबारक म्हणाला, " मी जिवंत आहें. एका रजपूतानं मला कबरेंतून बाहेर काढून औषध देऊन सजीव केलं. त्याच्याचबरोबर मीं इथं आलोंय. "

जेबुन्निसेनें त्याचे पाय सोडले नाहींत. तिच्या डोळ्यांतल्या आंसवांनीं मुबारकचे पाय भिजून गेले होते. मुबारकनें तिचे हात धरून तिला उठवायचा प्रयत्न केला पण जेबुन्निसा उठली नाहीं. ती म्हणाली, " माझ्यावर दया कर—मला क्षमा कर ! "

" मी तुला क्षमा केली आहे. " मुबारक म्हणाला, " तुला क्षमा केली नसती तर असा हा इथं आलोंच नसतों. "

जेबुन्निसा म्हणाली, " आतां तूं आलास, मला क्षमा केलीस. आतां माझा स्वीकार कर—माझा स्वीकार कर आणि वाटलं तर मला सापाच्या तोंडीं दे—नाहींतर काय वाटेल तें करायला सांग—तूं सांगशील तें ऐकेन—पण मला आतां टाकून जाऊं नकोस. मी तुला शपथेवर सांगतें, कीं आतां मी दिल्लीला जायची गोष्टसुद्धां काढणार नाहीं. अलमगीर बादशहाच्या रंगमहालांत पाऊलसुद्धां देणार नाहीं. शहाजाद्याशीं शादी करायचं मनांतसुद्धां आणणार नाहीं. मी तुझ्याबरोबर येणार. "

मुबारक सारें कांहीं विसरला—सर्पदंशाच्या यातना विसरला—जीव देण्याची प्रतिज्ञा विसरला—दर्याबिबीलासुद्धां विसरला—जेबुन्निसेचें तें पूर्वीचें प्रीतीशून्य असह्य भाषणसुद्धां विसरून गेला. जेबुन्निसेच्या असामान्य सौंदर्यानें त्याचे डोळे यावेळीं दिपून गेले होते. जेबुन्निसेची प्रेमानें ओथंबलेली करुणवाणी त्याच्या कानांत गुणगुणत होती. शहाजादीचा अभिमान विरून गेलेला पाहून त्याचें मन विरघळलें होतें.

त्यावेळीं मुबारकनें तिला विचारलें, " या गरीबाला तूं यावेळीं पती म्हणून स्वीकारायला तयार आहेस का ? "

जेबुन्निसेचे डोळे भरून आले होते. ती हात जोडून म्हणाली, " एवढं भाग्य आहे का माझ्या कपाळीं ? "

बादशहाजादी आतां बादशहाजादी राहिली नव्हती—एक मानवी झाली होती. मुबारक म्हणाला, " तर मग चल—भिऊं नकोस—संकोच धरूं नकोस—चल माझ्याबरोबर. "

दिवा लावायचें साधन त्याच्यापाशीं होतें. मुबारकनें दिवा पेटवून कंदिलांत ठेवला आणि तो बाहेर येऊन उभा राहिला. त्यानें सांगितल्याप्रमाणें जेबुन्निसेनें वेषभूषा केली. तिचा हात धरून मुबारक खोलीच्या बाहेर आला. तिथें पहाऱ्यावर दासी होत्या, मुबारकनें खूण करतांच त्या त्या दोघांच्याबरोबर चालूं लागल्या.

जात असतांना मुबारकनें जेबुन्निसेला सांगितलें, कीं तिथल्या राजरीतीप्रमाणें पुरुषाला अंतर्गृहांत येणें—विशेषतः मुसलमान पुरुषाला येणें—अशक्य होतें, म्हणूनच त्याला रात्रीच्या वेळीं यावें लागलें—तेंही केवळ महाराणीची कृपा झाली म्हणून—आणि तेंही महाराणीनें पहारेकरी दासी बरोबर दिल्या म्हणून.

सिंहद्वारापर्यंत त्या दोघांनाही पायीं जावें लागलें. दाराबाहेर गेल्यावर मुबारक-साठीं घोडा आणि जेबुन्निसेसाठीं मेणा तयार होता.

ते बाहेर आल्यावर पहारेकरी दासी निघून गेल्या आणि त्या दोघांनीही आपापलीं वाहनें ताब्यांत घेतलीं. उदयपुरांत सौदागरी करण्यासाठीं चार दोन मुसलमान रहात असत. त्यांनीं महाराण्याच्या परवानगीनें नगराबाहेर एक लहानशी मशिद उभारली होती. मुबारक जेबुन्निसेला घेऊन त्या मशिदींत

गेला. तिथें एक मुल्ला, एक वकील आणि एक साक्षीदार तयार होता. त्यांनीं मुबारकचें मुसलमानी पद्धतीप्रमाणें यथाविधी लग्न लावून दिलें.

तो विधी उरकल्यावर मुबारक म्हणाला, "तुला आतां जिथून मी घेऊन आलों तिथंच नेऊन पुन्हां पोचवलं पाहिजे. अजून तूं महाराणीची कैदी आहेस, पण लवकरच तुझी मोकळीक होईल अशी मला आशा आहे."

मुबारकनें जेबुन्निसेला पुन्हां तिच्या शेजघरांत नेऊन पोंचवलें.

: ७ :

● **दुसरे** दिवशीं चंचलकुमारीची भेट झाली तेव्हां जेबुन्निसा मोठ्या उल्हसित वृत्तीनें तिच्याशीं बोलूं लागली. दोन दिवसांच्या जागरणामुळें ती थकली होती. काळजीनें काळवंडली होती. हिऱ्यामाणकाचे अलंकार घालून फुलांनीं मढविलेली जी जेबुन्निसा शीसमहालांतल्या आरशाआरशांतून आपलें प्रतिबिंब पाहून हंसत असे, ती जेबुन्निसा आतां राहिली नव्हती. जेबुन्निसेला आतां कळून चुकलें होतें, कीं बादशहाजादी असली तरी ती स्त्रीच. बादशहाजादीचेंदेखील स्त्रीचेंच हृदय. स्नेहशून्य स्त्रीहृदय म्हणजे जलशून्य नदी—नुसतें वाळवंट—नुसतें कोरडें झालेलें सरोवर—नुसतें चिखल असलेलें सरोवर.

जेबुन्निसेचा अभिमान आतां गळाला होता. मोकळ्या मनानें तिनें गेल्या रात्रीं घडलेली सर्व हकिकत चंचलकुमारीला सांगितली. चंचलकुमारीचेंच तें सर्व नाटक होतें. सारें कांहीं सांगून झाल्यावर जेबुन्निसा हात जोडून तिला म्हणाली, "महाराणी, मला आतां कैदेंत कशाला ठेवतां? यापुढं मी अलमगीर बादशहाची कन्या नाहीं तें पूर्वीचं सारं मी विसरून टाकलंय. आतां तुम्ही मला बादशहाकडे पाठवलं तरी मी तिकडे जाणार नाहीं—अन् गेलें तर मी जिवंत राहीन असं वाटत नाहीं. आतां मला तुम्ही मोकळी करा म्हणजे मी माझ्या पतीबरोबर त्याच्या देशांत—तुर्कस्तानांत निघून जाईन."

तिचें तें भाषण ऐकून चंचलकुमारी म्हणाली, "याबाबतींत कोणताही निर्णय घेणं माझ्या हातीं नाहीं. तो अधिकार आहे खुद्द महाराण्याचा. त्यांनीं तुम्हाला माझ्या ताब्यांत दिलं आहे. आतां हें जें कांहीं घडलं तें सारं महाराण्यांचा

सेनापती माणिकलाल याच्यामुळं. माणिकलालचे माझ्यावर मोठे उपकार झाले आहेत म्हणूनच मी हें सारं कांहीं करायला परवानगी दिली. तुम्हाला मोकळीक द्यायच्याबद्दल त्यानं मला कांहीं सांगितलं नाहीं, अर्थात् या बाबतींत मला कांहीं बोलतां येत नाहीं. ”

जेबुन्निसा खिन्न होऊन म्हणाली, “ माझी ही विनंति तुम्ही महाराजापर्यंत नाहीं का पोंचवणार ? त्यांची छावणी इथून फारशी दूर नाहीं. काल रात्रीं पर्वतावरच्या त्यांच्या छावणींतले दिवे मला स्पष्ट दिसत होते. ”

चंचलकुमारी म्हणाली, “ इथून दिसतो तितका तो पर्वत जवळ नाहीं. आम्हां पहाडी लोकांनाच त्याची कल्पना आहे. तें कांहीं का असेना, तिकडे माणूस पाठवणं फारसं कठिण नाहीं; पण राणाजी या कामीं संमति देतील असं मला नाहीं वाटत. उदयपुरच्या छोट्याशा सैन्याला मोगल राज्याचा विध्वंस करतां आला असता, किंवा बादशहाबरोबर तह करण्याचा संभव मुळींच नसता, तर राणाजींनीं तुम्हाला आपल्या पतीबरोबर जायची परवानगी अवश्य दिली असती; पण आज ना उद्यां तह करावा लागणारच, तेव्हां त्यावेळीं तुम्हाला पुन्हां बादशहाच्या हवालीं करावं लागेल. ”

“ त्यापेक्षां मला तोफेच्या तोंडींच कां देत नाहीं ? ” जेबुन्निसा म्हणाली, “ या आमच्या शादीची बातमी जर बादशहाला लागली तर तो मला विष घातल्याशिवाय राह्यचा नाहीं. माझ्या पतीची गोष्ट तर बोलूंच नका. यापुढं त्यानी दिल्लीला जाणं तर अशक्यच आहे—गेले तर मृत्यु निश्चित्. हें लग्न झालं खरं पण यांतून कोणतं अभीष्ट सिद्ध झालं महाराणी ? ”

“ यांतून कांहीं वाईट निघूं नये एवढीच खबरदारी घेतां येईल असं वाटतं मला. ” चंचलकुमारी म्हणाली.

अशा प्रकारें त्यांचें बोलणें चाललेलें असतांना तिथें निर्मलकुमारी घाईघाईनें येऊन हजर झाली. तिनें चंचलकुमारीला प्रणाम केला अन् त्याचवेळीं जेबुन्निसेलाही अभिवादन केलें.

चंचलकुमारीनें तिला विचारलें, “ अशी कसल्या घाईत आहेस निर्मल ? ”

“ कांहीं महत्वाची बातमी आहे ” असें निर्मल म्हणाली तेव्हां जेबुन्निसा तिथून उठून गेली.

चंचलनें विचारलें, " युद्धाचीच बातमी ना ? " निर्मल ' हो ' म्हणाली त्यावेळीं तिनें पुन्हां विचारलें, " ती तर सारेच लोक बोलताहेत. उंदीर बिळांत सांपडला आहे, महाराण्यानं बिळाचं तोंड बुजवून टाकलंय. आतां उंदीर बिळांत सडून मरायला झाला आहे असं ऐकलं आहे मी. "

निर्मल म्हणाली, " त्यानंतर आणखी कांहीं थोडं घडलंय. उंदराला फार भूक लागल्याय. त्यानं माझं तें कबूतर आज माझ्याकडे धाडलंय अन् त्याच्या पायाला बांधून बादशहानं एक चिठ्ठी लिहून पाठवली आहे. "

" कुणाच्या नांवें आहे ती चिठ्ठी ? "

" इमली बेगमच्या नांवें. "

" काय लिहिलंय त्यांत ? " असें चंचलकुमारीनें विचारलें तेव्हां निर्मलनें तें पत्र बाहेर काढून त्यांतला कांहीं भाग वाचून दाखवला. तो असा :—

> " मी ज्या प्रकारें तुझ्याशीं स्नेह जोडला तसा यापूर्वी कधींच कोणाशीं जोडला नव्हता. तूंही माझ्याशीं सहानुभूति दाखवलीस. लोकांच्या तोंडून तुला ऐकूं आलं असेलच कीं आज पृथ्वीश्वराची दुर्दशा झाली आहे. तो अन्नावांचून मरतो आहे. एका रोटीच्या तुकड्यासाठीं भीक मागायची पाळी त्याच्यावर आहे. तुला कांहीं उपाय करतां येईल का ? शक्य असल्यास कर. हे तुझे उपकार मी कधींही विसरणार नाहीं. "

चंचलकुमारीनें विचारलें, " आतां काय करणार आहेस ? "

निर्मल म्हणाली, " तें कांहीं मला सांगतां येत नाहीं. दूसरं कांहीं करतां आलं नाहीं तरी बादशहा आणि जोधपुरी बेगम यांच्यासाठीं कांहीं तरी खाद्य पाठवीन म्हणतें. "

" कसं पाठवणार ? " चंचल म्हणाली, " तिथं तर कुणाला जातां येत नाहीं ना ? "

" तें कांहीं आतांच सांगतां येत नाहीं " निर्मल म्हणाली, " मला छावणींत जायची परवानगी द्या. तिथं गेल्यावर मला काय करतां येतं तें पाहतें. "

चंचलकुमारीनें संमति दिली. निर्मलकुमारी हत्तीवर बसून रक्षक बरोबर घेऊन छावणींत आपल्या नवऱ्याला भेटायला गेली. माणिकलालची आणि

तिची भेट झाली तेव्हां त्यानें विचारलें, " कशाला आली आहेस ? लढाई करायला का ? "

" कुणाबरोबर लढाई करूं ? " निर्मल म्हणाली, " तुमची लायकी आहे का माझ्याशीं लढाई करायची ? "

" नाहींच मुळीं ! " माणिकलाल म्हणाला, " पण अलमगीर बादशहाशीं ? "

" मी त्याची इमली बेगम ना ? " निर्मल म्हणाली, " त्यांच्याशीं मी लढाई कशी करूं ? मी त्यांच्या सोडवणुकीसाठीं आलें आहें. आतां मी काय सांगतें तें लक्षपूर्वक ऐकून घ्या आणि माझ्या हुकुमाबरहुकुम कामगिरी करा. "

त्यानंतर बराच वेळपर्यंत माणिकलाल आणि निर्मलकुमारी यांनीं खलबत केलें. निर्मलकुमारीला उदयपुरला परत पाठवून माणिकलाल राजसिंहाच्या भेटीसाठीं राण्याच्या तंबूंत गेला.

## : ८ :

● **महाराण्यांची** भेट होतांच त्यांना प्रणाम करून माणिकलाल हात जोडून म्हणाला, " या दासाला दुसऱ्या कुठल्या तरी युद्धक्षेत्रावर पाठवायची महाराजांनीं कृपा केली तर माझ्यावर मोठे उपकार होतील. "

" कां ? " राणाजी म्हणाले, " इथं काय झालंय ? "

" इथं कांहींच काम नाहीं. " माणिकलालनें उत्तर दिलें, " काम आहे एवढंच, कीं भुकेलेल्या मोंगलांचं विव्हळणं ऐकायचं. अन् त्यांचं सुकलेलं तोंड पहायचं. पहाडावर चढून मधून-मधून तें पाहून येत असतों.—पण हें काम कुणालाही करतां येईल. मला काळजी पडल्याय ती ही, एवढी माणसं, हत्ती, घोडे, उंट या बिळांत मरून सडले तर त्या दुर्गंधीच्या पायीं पटकी सुरू होईल आणि उदयपुरचे लोक मरतील. "

" म्हणजे तुझं म्हणणं तरी काय ? " राणाजी म्हणाले, " मोंगलांची फौज उपाशी मरूं देऊं नये, असंच ना ? "

" असंच म्हणा ना—" माणिकलाल म्हणाला, " लढाईत लाखों लोकांचे जीव घेतले तर त्याचं कांहीं वाटत नाहीं--बसल्या बैठकीला उपासपोटीं एक माणूस जरी मेला तरी दुःख होतं मनाला. "

" मग या बाबतींत काय करायचं असं तुझं म्हणणं ? " राणाजी म्हणाले.

" या बाबतींत सल्ला देण्याइतकी अक्कल मला नाहीं, महाराज ! " माणिकलाल म्हणाला, " माझ्या अल्पबुद्धीला असं वाटतं, कीं तह करायला ही वेळ योग्य आहे. पोटांत आग पेटली म्हणजे मोगल जसा नरम होईल तसा भरल्या पोटावर होणार नाहीं. मला वाटतं, राजमंत्री आणि सेनापती यांना बोलावून घेऊन या बाबतींत काय करतां येईल त्याचा विचार व्हावा. "

राजसिंहाला माणिकलालचा हा प्रस्ताव पटला. इतक्या माणसांना उपासपोटीं मारणें त्यालाही रुचत नव्हतें. भुकेलेल्याला अन्नदान करणें हा हिंदूंचा मोठा धर्म—अतएव हिंदु आपल्या वैऱ्याला देखील उपासपोटीं मारण्याची इच्छा धरणार नाहींत.

संध्याकाळीं छावणींत राजसभा भरवण्यांत आली. त्या सभेला सेनापती आणि मुख्य मुख्य राजमंत्री हजर होते. राजमंत्र्यांचे मुख्य दयाळ शहा हेही हजर होते. त्या सर्वांत माणिकलालही होता.

राजसिंहानें सभासदांना आपला मनसुबा तपशिलवार सांगितला आणि त्यांचें मत विचारलें तेव्हां कित्येकजण म्हणाले, " मोगल इथं भुकेतहानेनं व्याकुळ होऊन खुशाल मरूं देत. औरंगजेब मेला तर त्याच्या मुलाला बोलावून घेऊन त्याची उत्तरक्रिया करूं—नाहींतर सर्वांना असेच टाकू पुरून. या मोगलांनीं आजवर रजपूतांना इतका त्रास दिला आहे, कीं आतां ते हातीं सांपडले असतां त्यांना सोडून द्यावं असं कुणीही म्हणणार नाहीं. "

यावर महाराणा म्हणाले, " एकवार आपण कबूल करूं, कीं मोगलांना आपण इथं उपासपोटीं मारून गाडून टाकूं. पण औरंगजेब आणि औरंगजेबाची इथं आलेली फौज मेली म्हणजे मोगल काहीं नामशेष होणार नाहींत. औरंगजेब मेला तर शहाअलम बादशहा होईल. दक्षिणेवर जय मिळवून आलेली त्याची मोगल फौज पहाडाच्या दुसऱ्या बाजूला आज सशस्त्र हजर आहे. तशीच दोन्ही बाजूला अशीच मोगलसेना आज छावणी ठोकून आहे. त्या सर्वांचा नायनाट करणं आपल्याला शक्य आहे का ? तसं शक्य नाहीं असं वाटत असेल तर केव्हांतरी आपल्याला तह करावा लागेल. तहच करायचा असला तर आजच्यासारखी संधि पुन्हा केव्हां मिळणार आहे ? आज औरंगजेबाचे

प्राण कंठाशीं आले आहेत—यावेळीं आपण घालूं त्या अटी कबूल करणं त्याला भाग पडेल. ही संधि घालवली तर पुढं कठिण जाईल. ”

दयाळ शहा म्हणाला, “ नाहीं का मिळेना संधि ! या महापापी औरंगजेबाचा वध झाला तर जगाचा एक कांटा नाहींसा होईल. या कार्यासारखं दुसरं पुण्यकार्य नाहीं. महाराजांनीं यावेळीं तरी पड खाऊं नये. ”

राजसिंह म्हणाला, “ आज सारेच मोगल बादशहा जगाला कांट्यासारखे होऊन बसले आहेत. शहाजहाँपेक्षां औरंगजेब अधिक नराधम आहे का ? खुशरूनं जेवढं आपलं नुकसान केलं तेवढं औरंगजेबानं केलंय का ? शहाअलम आपल्या वाडवडिलांपेक्षां अधिक दुराचारी होणार नाहीं हें कुणी सांगावं ? तुम्हाला जसं वाटतं तसंच मलाही वाटतं—या चारही मोगलांच्या फौजा आम्ही नेस्तनाबूत करूं—पण विचार करून पहा, कीं त्यापायीं किती माणसांचा संहार करावा लागेल ? असंख्य रजपूत देखील नाहीं का कामाला यायचे ? मग किती जण शिल्लक राहतील ? आम्ही अल्पसंख्य आहों, मुसलमान बहुसंख्य आहेत, आमच्यांतलीं बहुसंख्य माणसं कामास आली आणि मग मोगलांनीं चढाई केली तर कुणाच्या बाहुबलावर आपल्याला मोगलांना घालवून देतां येईल ? ”

दयाळ शहा म्हणाला, “ महाराज, सारा राजपुताना एकत्र झाला तर मोगलांना सिंधु नदीच्या पार करायला कितीसा वेळ लागेल ? ”

“ तें खरं आहे. ” राजसिंह म्हणाला, “ पण असं यापूर्वी घडलंय का ? आपण अजूनही प्रयत्न करतों आहोंत—तरी तें घडतंय का ? मग कोणत्या आधारावर आपण वाट पाह्यची ? ”

दयाळ शहा म्हणाला, “ तह केला तरी औरंगजेब तो पाळील अशी खात्री देण्यांत अर्थ नाहीं. त्याच्यासारखा विश्वासघातकी खोटारडा कुणी नाहीं. सुटणूक होतांच तो तहनामा फाडून टाकील अन् जें करायचं तेंच करील. ”

राजसिंह म्हणाला, “ तर मग आतां तह करतां येत नाहीं असंच का समजायचं ? ”

यावर आणखीही बरीच चर्चा झाली. शेवटीं राण्याच्या सूचनेला सर्वत्रांनीं संमति दिली. तह करावा असें ठरलें पण त्याचवेळीं कुणीतरी म्हणाला,

" आज कुणी तह करायची मागणी करायची असेल तर ती औरंगजेबानं. त्यानं कुणी दूत पाठविलाय का ?"

राणाजी म्हणाले, " दूत इथं येईल कसा ? त्या भुयारांतून एक मुंगी येण्याइतकीसुद्धां आपण वाट ठेवलेली नाहीं."

" मग आमचा तरी दूत त्यांच्याकडे जाणार कसा ?" दयाळ शहानें विचारलें, " पूर्वी आमचा दूत गेला होता त्यावेळीं औरंगजेबानं त्याची कत्तल करायचा हुकुम दिला होता—आजही तो तसंच करणार नाहीं कशावरून ?"

" या प्रसंगीं तरी तो तसं करणार नाहीं खास." राणाजी म्हणाले, " यावेळीं कसाबसा तह करून घेण्यांतच त्याचं कल्याण आहे. तरीपण त्याच्याकडे दूत पाठवायचा कसा हाही एक प्रश्नच आहे."

तें ऐकून माणिकलाल म्हणाला, " ही कामगिरी माझ्यावर सोपवा. मी महाराण्यांचं पत्र औरंगजेबाला पोंचवतों आणि त्याचं उत्तर आणून देतों."

सर्वांनाच तें पटलें. कौशल्यांत आणि धाडसांत माणिकलाल अद्वितीय आहे हें सर्वांनाच माहित होतें. अर्थात् औरंगजेबाला पत्र लिहिण्याचा हुकूम देण्य त आला. दयाशहानें जें पत्र लिहिलें त्याचा सारांश असा होता.—

> " आपलें सारें सैन्य घेऊन बादशहानें मेवाडमधून निघून जावें. मेवाडांत गोहत्या आणि देवालयभंग त्यानें करूं नयेत. जिजिया कर मागूं नये. असें केलें तर राजसिंह वाट मोकळी करून देईल आणि बादशाहला निरुद्वेग आपल्या राजधानींत जातां येईल."

हें पत्र सर्वत्रांना वाचून दाखवलें त्यावेळीं माणिकलाल म्हणाला, " बादशहाची एक बेगम आणि मुलगी आमच्या कैदेंत आहे. त्यांना इथंच अडकवून ठेवायचं का ?"

त्याचे ते उद्गार ऐकून सारेच हंसूं लागले. सर्वांनीं एका आवाजांत सांगितलें, कीं त्यांना सोडायचं नाहीं. कुणी म्हणाले, " त्यांना राहूं देत इथं. त्या महाराजांचं अंगण झाडतील." कुणी म्हणाले, " त्यांना ढाक्याला पाठवून द्या. त्या तिथं हिंदु होतील आणि वैष्णवी बनून हरिभजन करतील." कुणी म्हणाले, " त्यांच्या मोबदल्यांत प्रत्येकीं एक कोट मोहरा बादशहानं द्याव्या." प्रत्येकजण आपापल्या परीनें सूचना करीत होता. तेव्हां राणाजी म्हणाले, " दोन

मुसलमान बाँदींच्या पायीं तहाला डाग कां लावायचा ? त्या दोघींनाही परत पाठवण्यांत येईल असं त्या पत्रांत लिहा. ”

तसेंच लिहून पत्र माणिकलालच्या हातीं देण्यांत आलें.

: ९ :

दरबार बरखास्त झाला तरी माणिकलाल गेला नाहीं. सारे निघून गेल्यावर माणिकलाल राणाजींना म्हणाला, “ मुबारकला बक्षिस द्यायचं आहे ना ? ”

“ काय हवंय त्याला ? ” राणाजींनीं विचारलें.

“ बादशहाची जी मुलगी आमच्या कैदेंत आहे, ती त्याला हवी आहे. ”

“ तिला जर आपण बादशहाकडे परत पाठवली नाहीं तर बादशहा कदाचित् तह करणार नाहीं.—अन् कुठल्याही स्त्रीवर अशी सक्ती करणं आपल्याला कसं शोभेल ? ”

“ सक्ती करायलाच नको मुळीं. ” माणिकलाल म्हणाला, “ काल रात्रीं शहाजादीबरोबर मुबारकची शादी होऊन गेल्याय. ”

राणाजी म्हणाले, “ ही गोष्ट शहाजादीनंच बादशहाला सांगितली कीं सारा तंटा मिटेल. ”

“ कीं दोघांचीही मुंडकी बादशहा छाटील ? ” माणिकलालनें विचारलें, “ शहाजादीचं लग्न शहाजाद्याशिवाय इतराशीं व्हायचं नसतं. या शहाजादीनं एका सामान्य सैनिकाबरोबर लग्न करून दिल्लीच्या बादशहाच्या कुळाला कलंक लावलाय. बादशहाच्या संमतीशिवाय तिनें हें लग्न केलंय म्हणून दिल्लीच्या रिवाजाप्रमाणें तिनें विष खाऊन जीव दिला पाहिजे. ज्याअर्थी मुबारक सापाच्या विषानं मेला नाहीं त्याअर्थी त्याला हत्तीच्या पायीं देतील किंवा सुळावर चढवतील.—शिवाय तो आपल्या उपयोगीं पडला आहे असं बादशहाच्या कानीं पडलं तर तो बादशहा त्याला खात्रीनं सूळावरच चढवील. ”

“ पण याचा प्रतिकार मी कसा करणार ? ”

“ मुलगी आणि जांवई यांना औरंगजेबानें क्षमा केली नाहीं तर आम्ही तह करणार नाहीं अशी अट तहांत घालण्यांत यावी. ” माणिकलाल म्हणाला.

" ही गोष्ट मला कबूल आहे. " राणाजी म्हणाले, " तसें एक वेगळं पत्र मी बादशहाला लिहितों तेंही तूं बरोबर घेऊन जा. औरंगजेब मुलीला क्षमा करील पण मुबारकाला सोडील असं मला वाटत नाहीं. पुढं केव्हांतरी दगा देईल. कसं का असेना, तेवढ्यानं मुबारकचं समाधान होत असेल तर त्यांत मला आनंदच आहे." असें म्हणून राजसिंहानें स्वतः पत्र लिहून तें माणिकलालच्या हातीं दिलें. तीं दोन्हीं पत्रें घेऊन माणिकलाल उदयपुरला गेला आणि त्यानें सारी हकीकत निर्मलकुमारीला सांगितली.

निर्मलचें समाधान झालें. तिनेंही बादशहाला पत्र लिहिलें त्याचा सारांश असा :—

" हुजुरांनीं जी आज्ञा केली त्याप्रमाणें बाँदीनें आपलें काम केलें आहे. आतां फक्त हुजुरांची संमती हवी आहे. माझें शेवटचें सांगणें एवढेंच, कीं तह करावा. "

हेंही पत्र तिनें माणिकलालपाशीं दिलें.

त्यानंतर निर्मलकुमारीनें जेबुन्निसेला भेटून तिला ही सर्व हकिकत सांगितली. ती ऐकून तिचेंही समाधान झालें. तिकडे माणिकलालनेंही मुबारकला ही बातमी दिली तेव्हां मुबारक कांहीं बोलला नाहीं. त्याला सावध करण्याच्या उद्देशानें माणिकलाल म्हणाला, "साहेब, तुम्ही बादशहाकडे जाणार आहां खरे, पण तो तुम्हाला क्षमा करीलच याचा मला भरंवसा नाहीं. "

मुबारक म्हणाला, " नाहीं का करीना ! "

दुसरें दिवशीं सकाळीं माणिकलालनें निर्मलकुमारीचें कबूतर मागवून घेतलें आणि ती तिन्ही पत्रें त्यानें काटछाट करून त्याच्या पायाला बांधली. कबूतर सोडून देतांच तें आकाशांत उडालें खरें पण पायाचा भार त्याला त्रास देत असावें असें वाटलें.

शेवटीं कबूतर औरंगजेबापाशीं जाऊन पोचलें आणि ती तीनही पत्रें बादशहाच्या हातीं गेलीं.

## : १० :

**औरंगजेबाचें** उत्तर घेऊन कबूतर पुन्हां परत आलें. राजसिंहाच्या सर्व मागण्या औरंगजेबानें कबूल केल्या होत्या. त्यानें एकच अट घातली होती—

"चंचलकुमारीला माझ्या स्वाधीन करा"—त्याला राजसिंहानें उत्तर पाठविलें, "त्यापेक्षां बादशहाला ससैन्य कबर देणेंच मला आवडेल."

अर्थात् औरंगजेबाला ती अट सोडून देणें भाग पडलें. त्यानें तहाला कबूली दिली आणि त्याप्रमाणें संधिपत्र मुनशीकरवीं लिहून घेऊन त्याच्यावर त्यानें स्वतःची शीलमोहोर केली आणि स्वतःच्या हातानें 'मंजूर' असें लिहून तें पत्र राजसिंहाकडे पाठवलें.

दुसरें एक स्वतंत्र पत्र लिहून औरंजेगबानें मुबारक आणि जेबुन्निसा यांना माफी देण्याची कबूली दिली. मात्र त्यांत त्यानें अशी अट घातली होती कीं, हें लग्न झाल्याची बातमी त्यांनीं कुठेंही बाहेर पडूं द्यायची नाहीं—त्याचवेळीं त्यानें अशीही कबुली दिली होती, कीं आपल्या मुलीला आपल्या नवऱ्याची भेट घ्यायला आपल्याकडून अडथळा होणार नाहीं.

तहनामा हातीं येतांच राणा राजसिंहानें मोगल सेनेची वाट मोकळी करण्याचा हुकूम दिला. भुयाराच्या दाराशीं टाकलेली झाडाचीं ओंडकी हत्ती लावून दूर करण्यांत आलीं. मोगलांना आयत्या वेळीं खाण्याचे जिन्नस मिळणार नाहींत हें ध्यानीं घेऊन राजसिंहानें दयाभूत अंतःकरणानें हत्तीच्या पाठीवर खाण्यापिण्याचे जिन्नस चढवून मोगलांपाशीं पाठवून दिले. आणि शेवटीं उदयपुरी, जेबुन्निसा आणि मुबारक यांनाही औरंगजेबापाशीं पाठवून देण्याचा त्यांनीं हुकूम सोडला.

हा हुकूम आलेला पाहतांच चंचलकुमारीच्या कानाशीं लागून निर्मल म्हणाली, "बेगमेनं तुमची सेवा केली आहे कुठं!" लगेच ती उदेपुरीकडे वळून म्हणाली, "जें निमंत्रण देण्यासाठीं मी दिल्लीला गेलें होतें तें तुम्ही अजून कां पाळलं नाहीं?"

उदेपुरी म्हणाली, "तुझ्या जिभेचे मी तुकडे तुकडे करीन. मला हुक्का भरून द्यायची सक्ती करायची काय शहामत आहे तुम्हा लोकांची! बादशहाच्या बेगमेला अटक करून ठेवायला तुमच्यासारख्या हलकट लोकांना कसं साधेल! आतां माझी सुटणूक होऊं दे तर खरी, तुम्ही जो माझा अपमान केला आहे त्याचा मी यथास्थित सूड घेईन—उदयपुरचं नांवनिशाण सुद्धां राहूं देणार नाहीं."

चंचलकुमारी शांतपणें म्हणाली, " राणाजींनी तुमची सुटका केली आहे ती बादशहावर दया दाखवून. त्यांच्यासाठीं एकादा गोड शब्द बोलणं देखील सुचत नाहीं का तुम्हाला ? आतां ऐका तर—तुम्हाला इथून सोडण्यांत येणार नाहीं. बाँदीमहालांत जा आणि माझ्यासाठीं हुक्का भरून आणा. "

तें ऐकून जेबुन्निसा म्हणाली, " महाराणी, अशी निर्दय कां होतेस ? "

चंचलकुमारी म्हणाली, " आपण दोघें जा. आपल्याला कुणी अडवणार नाहीं. हिला मात्र यावेळीं मी इथून सोडणार नाहीं. "

जेबुन्निसेनें तिची परोपरीनें विनवणी केली. शेवटीं उदेपुरीही बरीचशी ताळयावर आली, पण चंचलकुमारीनें आपला हट्ट सोडला नाहीं. अगदीं तडजोड म्हणून ती एवढेंच म्हणाली, " हिनं माझ्यासाठीं एकदांच हुक्का भरून द्यावा. कीं मी हिला मोकळी करीन. "

उदेपुरी म्हणाली, " मला हुक्का भरतां येत नाहीं. "

चंचलकुमारी म्हणाली, " माझ्या दासी तुला शिकवतील. "

आतां उदेपुरीला कबूल केल्यावांचून गत्यंतर उरलें नाहीं. दासींनीं तिला दाखवून दिलें आणि उदेपुरी हुक्का भरून देऊन चंचलकुमारीपाशीं आली. चंचलकुमारीनें सलाम करून तिला निरोप दिला. ती म्हणाली, " इथं जें जें कांहीं घडलं तें तें तुम्ही जाऊन बादशहाला सांगा आणि त्याला आठवण द्या— म्हणावं, मी नुसती त्याच्या लाथ मारून तसबिरीवर त्याचं नाक तोडलं होतं, पण यापुढं हिंदुंच्या मुलीचा असा अपमान करायची तुझ्या बादशहाला वासना झाली, तर नुसत्या तसबिरीवर लाथ मारून मी स्वस्थ राहणार नाहीं. "

तें ऐकून उदेपुरीचा चेहरा काळवंडला. चंचलकुमारीचा निरोप घेऊन ती निघून गेली.

बेगम, कन्या आणि खाद्यद्रव्य मिळतांच औरंगजेब फटका बसलेल्या कुत्र्यासारखा पायांत शेपूट घालून राजसिंहाच्या राज्यांतून चालता झाला—पळून गेला.

## : ११ :

● **बेगमेची** रवानगी केल्यानंतर चंचलकुमारीला पुन्हां पेंच पडला. मोगल पराभूत झाले, बादशहाच्या बेगमेनें तिची सेवा केली, पण राणाजी तर

कांहीं बोलत नव्हते. चंचलकुमारी रडत आहे असें पाहून निर्मलला तिच्या मनोभावनेची कल्पना आली. निर्मलनें तिला विचारलें, " राणाजींना तूं त्यांच्या वचनाची आठवण कां देत नाहींस ? "

" तुला वेड का लागलंय ? " चंचल म्हणाली, " बायकांच्या जातीला असला प्रश्न पुन्हां पुन्हां विचारतां येतो का ? "

" तर मग रूपनगरला पत्र लिहून आपल्या पिताजींना कां बोलावीत नाहींस ? " निर्मल म्हणाली.

" कसं बोलवायचं ? " चंचल म्हणाली, " त्या पत्राचं तें तसं उत्तर आल्यावर पुन्हां पत्र कसं लिहायचं ? "

" बापाजवळ राग कशाला धरायचा ? "

" हा राग नव्हे. मी एकदां लिहिलं—माझ्या पत्राला तें तसं निर्दयपणाचं उत्तर आलं—त्याची आठवण झाली कीं अजूनही माझ्या हृदयाचा थरकांप होतो—एवढं झाल्यावर पत्र लिहायचं कसं ? "

" तें पत्र तूं लिहिलं होतंस तें लग्नासाठीं ना ? "

" आतां कशासाठीं लिहूं ? " चंचलनें विचारलें.

निर्मल म्हणाली, " राणाजी ज्याअर्थी कांहीं बोलत नाहींत त्याअर्थी मला वाटतं बापाच्या घरीं जाऊन रहाण्याखेरीज गत्यंतर नाहीं. आतां औरंगजेब या बाजूला फिरकणार नाहीं म्हणून पत्र लिही, असं म्हणतेंय मी "

यावर चंचलकुमारी कांहींतरी उत्तर देणार होतीं, पण बोलतां बोलतां तिला एकदम रडण्याचा उमाळा आला. तें पाहून तसा प्रस्ताव केल्याबद्दल निर्मलही ओशाळली.

चंचलकुमारीनें एकदां डोळे पुसून घेतले. ती लाजून हंसली. निर्मल देखील हंसली. ती म्हणाली, " दिल्लीच्या बादशहासमोर देखील मी कधीं ओशाळलें नव्हतें, आज तुझ्यासमोर ओशाळलें. दिल्लीच्या बादशहापेक्षांही तूं मोठी ठरलीस. इमलीबेगमलासुद्धां थोडी लाज वाटली पाहिजे. आतां तूं एकदां इमलीबेगमची मुनशीगिरी पहा. कागद लेखणी घेऊन लिहायला सुरवात कर—मी सांगतें तसं लिही. "

" कुणाला लिहूं ? " चंचलनें विचारलें, " आईला कीं बाबांना ? "

निर्मल म्हणाली, " बाबांना. "

चंचलकुमारीनें लिहिण्याची तयारी केली तेव्हां निर्मलनें सांगायला सुरवात केली, " आतां मोगलबादशहा महाराण्याच्या हातून—"

' बादशहा ' पर्यंत लिहून चंचलकुमारी म्हणाली, " महाराण्याच्या हातून असं नाहीं लिहीत मीं. रजपुतांच्या हातून असं लिहीन. "

निर्मलकुमारी थोडीशी हंसली आणि म्हणाली, " बरं, बरं, तसं लिही. " त्यानंतर निर्मल सांगत होती अन् ती लिहीत होती :—

"—हातून पराभव पावल्यामुळें राजपुताना सोडून पळून गेला आहे. यापुढें त्याच्यापासून आपल्याला त्रास होण्याचा संभव नाहीं, कीं तो आपल्यावर जोर जबरदस्ती करणार नाहीं. यापुढें आपल्या लेकराला आपला काय हुकुम आहे ? मी आपल्या हुकुमांत आहें—"

मधेंच निर्मल म्हणाली, " महाराण्याच्या नाहीं वाटतं ? "

चंचल म्हणाली, " दूर हो चांडाळणी. तसं नाहीं लिहायची मी. "

निर्मल म्हणाली, " तर बाई लिही—मी सध्यां सर्वस्वी स्वतंत्र आहें. " चंचलनें तसेंच लिहिलें.

अशा प्रकारें पत्र लिहून झाल्यावर निर्मलच्या सांगण्याप्रमाणें तें पत्र रूपनगरला पाठवण्यांत आलें. रूपनगरहून उत्तर आलें तें असें—

" मी दोन हजार फौज घेऊन उदयपुरला येत आहें. घाटाचा रस्ता मोकळा करून द्यायला राण्याला सांगा. "

या चमत्कारिक आणि संदिग्ध उत्तराचा अर्थ काय करावा तें त्या दोघींनाही कळेना. बरीच चर्चा केल्यावर त्यांनीं ठरवलें, कीं ज्याअर्थी त्या पत्रांत फौजेचा उल्लेख केला आहे, त्याअर्थी ती हकिकत राणाजींना कळवणें अवश्य आहे. निर्मलकुमारीनें माणिकलालला बोलावून घेतलें आणि त्याच्याकरवीं राणाजींना ती हकिकत कळवली.

राणाजींनाही तोच प्रश्न पडला. ते चंचलकुमारीला विसरले नव्हते. त्यांनीं विक्रम सोळंकीला पत्र लिहून चंचलकुमारीच्या लग्नाच्या प्रश्नाबद्दल विचारलें. पूर्वीच्या पत्रांत विक्रमसिंहानें आपल्या मुलीला शाप दिला होता, त्याचीही त्यानें विक्रमसिंहाला आठवण दिली. त्याचप्रमाणें—राजसिंह हा आपल्या

मुलीला योग्य वर आहे अशी आपली खात्री होईल त्यावेळीं आपण येऊन कन्यादान करून आशीर्वाद देऊं, असें जें त्यांनीं म्हटलें होतें, त्याचीही आठवण दिली. यापुढें आपला अभिप्राय काय आहे असें त्या पत्रांत शेवटीं राणाजींनी विचारलें होतें.

या पत्राचें विक्रमसिंहानें उत्तर दिलें तें असें—

" मी दोन हजार स्वार घेऊन आपल्याकडे येत आहें. घाट खुला करावा."

चंचलकुमारीप्रमाणेंच राजसिंहालाही या त्याच्या उत्तराचा योग्य अर्थ लावतां येईना. त्याला वाटलें दोन हजार स्वार घेऊन विक्रमसिंह आला तर तो आपलें काय करील ? तरी पण आपण सावध रहावें असें ठरवून त्यानें विक्रमसिंहाच्या आगमनासाठीं घाटाचा रस्ता खुला करण्याचा हुकुम सोडला.

## : १२ :

**औरंगजेब** फिरून उदयसागरच्या तीरावर आला आणि त्यानें तिथें छावणी ठोकली. ती रात्र त्यानीं तिथेंच काढली. सर्वत्रांनीं तिथें उपास सोडला. एकजण मोगल म्हणाला, " हिंदुच्या राज्यांत आपण आलों होतों ना ? म्हणून एकादशीचा उपास केला. "

त्याचा तो उद्गार ऐकून त्याची बिबी म्हणाली, " अजून जगून वांचून राहिलों हेंच भाग्य. आम्हाला वाटलं होतं, कीं तुम्ही खतम झालां— म्हणून आम्हीही उपास केला होता. "

शिपायांच्या मेळाव्यांत आतां पुन्हां गाणें बजावणें सुरू झालें होतें. कांहीं शौकिन सैनिकांच्या बैठकींत एक गायिका गात होती. गातां गातां तिचा ताल चुकला. तेव्हां एका श्रोत्यानें तिला विचारलें, " हें काय झालं बिबीजान ? ताल चुकला कसा ?"

गायिका म्हणाली, " आपल्या सर्वांचं जें शौर्य वीर्य पाहिलं त्यावरून आतां या हिंदुस्थानच्या भागांत रहायचा धीर होत नाहीं आम्हाला. उढिया देशांत जावंसं वाटतंय. म्हणून अशा बेताल झालों आहों आम्हीं. "

कुणीकुणी उदेपुरी हरण केल्याची कथा बोलत होते, त्याची एका व्रात्य-हिंदु सैनिकानें रावणानें केलेल्या सीताहरणाशीं तुलना करायला सुरवात केली.

त्यावेळीं एकजण म्हणाला, " बादशहानं आपल्याबरोबर एवढे वानर आणले होते, मग सीतेची सुटका झाली नाहीं कशी ? "

दुसरा कुणी म्हणाला, " आम्ही आहों शिपाई—लाकूडतोडे नव्हे. लाकडं कापायची विद्या आम्हाला अवगत नव्हती म्हणून आम्ही हरलों. "

त्यावर एकजण म्हणाला, " तुम्ही फार तर गवत कापावं. लांकडं तोडणं काय होय तुम्हाला ? "

सुटका झाल्यामुळें प्रत्येकजण आपापल्या परीनें त्या पराभवाच्या गोष्टी थट्टेवारी नेत होता.

इकडे बादशहा शिबिरांतल्या अंतर्भागांत आला त्यावेळीं जेबुन्निसा त्याच्यासमोर येऊन हजर झाली. ती हात जोडून उभी आहे असें पाहून बादशहा तिला म्हणाला, " तूं जें कांहीं केलंस तें स्वेच्छापूर्वक केलं नाहींस असं मला आतां वाटतंय, म्हणूनच तुला क्षमा करतों आहें. पण सावध ! लग्नाची गोष्ट बाहेर फोडूं नकोस ! "

त्यानंतर बादशहा उदेपुरी बेगमला भेटला. उदेपुरीनें राण्याच्या राज्यांत झालेल्या आपल्या अपमानाची कथा बादशहाला तिखटमिठ लावूनच सांगितली. ती ऐकून बादशहाचा संताप झाला, तरीही तो थोडासा खिन्नच झाला होता.

दुसऱ्या दिवशीं बादशहानें मुबारकला एकांतांत बोलावून घेतलें आणि म्हटलें, " यावेळीं मी तुझ्या साऱ्या अपराधाबद्दल क्षमा करतों आहें, कारण आतां तूं माझा जांवई झाला आहेस. त्या माझ्या नात्याला शोभेसा अधिकार तुला देणं भाग आहे, म्हणून मी तुला दोन हजारांचा मनसबदार करतों आहें. आजच परवाना बाहेर पडेल. पण यावेळीं तुला इथं थांबून राहतां यायचं नाहीं. कारण शहाजादा अकबर आमच्याच सारखा पहाडांत अडकून पडला आहे. त्याला सोडवण्यासाठीं दिलिरखाँ फौज घेऊन पुढं जातों आहे. अर्थात् तुझ्यासारख्या लढवय्याच्या मदतीची तिथं अपेक्षा आहे. आजच्या आज तिकडे कूच कर. "

बादशहाच्या या भाषणामुळें मुबारकला मुळींच आनंद झाला नाहीं. लाघवीपणाचा आव आणला, कीं औरंगजेब बादशहा कुठेंतरी घात करणार असें समजावें हें त्याला माहित होतें. त्यानें एकप्रकारें मनाचा निश्चय केला होता

म्हणूनच बादशहाच्या या वर्तनाबद्दल त्याला कांहीं वाटलें नाहीं. मोठ्या अदबीनें बादशहाचा निरोप घेऊन तो दिलीरखाँच्या छावणीकडे जाण्याच्या तयारीला लागला.

तितक्यांत औरंगजेबानें आपल्या एका विश्वासू दूताकरवीं दिलेरखाँला पत्र पाठवलें. पत्राचा सारांश असा होता—'मुबारकखाँला दोन हजाराची मनसबदारी देऊन तुमच्याकडे पाठवला आहे. तो यापुढें एक दिवसही जिवंत राहतां कामा नये. लढाईंत मेला तर ठीकच—नाहींतर वाटेल त्या प्रकारानें त्याचा जीव घ्यावा.'

दिलेरखाँ मुबारकला ओळखीत नव्हता. बादशहाचा हुकूम शब्दशः पाळायचा असें त्यानें ठरवलें.

यानंतर औरंगजेबानें आम दरबारांत आपला अभिप्राय जाहीर केला. तो म्हणाला, "या गांवढळांनी आम्हाला पेचांत पकडलं म्हणून आम्ही त्यांच्याशी तह केला. हा कसला तह ? एका क्षुद्र भूमिया राजाबरोबर बादशहानं का तह करायचा ? मी तहनामा फाडून टाकला आहे. विशेषतः त्यानं रूपनगरच्या कुंवारीला आमच्याकडे पाठवून देण्याची आमची मागणी नाकारली. रूपनगरच्या रावानं तिला आमच्या हवालीं केली होती, अर्थात् राजसिंहाला तिला अडकवून ठेवायचा अधिकार नाहीं. यापुढं जशी लढाई सुरू होती तशीच चालू ठेवायची. राण्याच्या राज्यांतल्या गायी दिसल्या कीं मुसलमानानीं लगेच त्या मारायच्या. देवालयं दिसलीं कीं कोसळून घालायचीं. सर्वत्रांकडून जिजिया कर वसूल करायचा."

बादशहाच्या या भाषणाच्या अनुरोधानें सर्वत्र हुकुम सुटले.

तिकडे दिलिरखाँ देसुरीच्या रस्त्यानें मारवाडांतून उदयपुरांत घुसूं पहात आहे असें राजसिंहाला दिसून आलें तेव्हां त्यानें औरंगजेबापाशीं आपले लोक पाठवले आणि तह झाला असतांही ही लढाईची तयारी कां, असें विचारलें.

औरंगजेब म्हणाला, "सामान्य भुमियाच्याबरोबर का बादशहा तह करीत असतो ! बादशहाची रूपनगरी बेगम बादशाकडे परत पाठवली नाहीं तर तो तुमची मुळीच गय करणार नाहीं."

तें उत्तर ऐकून राजसिंह हंसला आणि म्हणाला, "मी अजूनही हयात आहें म्हणावं !"

रूपनगरची राजकुमारी राजसिंहानें सोडवून नेली ही गोष्ट औरंगजेबाच्या मनाला शल्ल्यासारखी लागून राहिली होती. राजसिंहाकडून आपलें उद्दिष्ट सिद्ध होत नाहीं असें जेव्हां त्याला दिसून आलें, तेव्हां त्यानें रूपनगरच्या राण्याला एक खलिता लिहिला. त्यांत त्यानें असें लिहिलें होतें, "आमच्या हुकूमाप्रमाणें तुझी मुलगी अजूनही आमच्यापाशीं येऊन हजर झाली नाहीं. तिला ताबडतोब आमच्यापाशीं हजर करावी. तसें केलें नाहीं तर रूपनगरच्या किल्ल्याचा एक दगडही शिल्लक रहाणार नाहीं."

बापानें संकट घातलें, जिद्द केली, म्हणजे चंचलकुमारी आपल्यापाशीं यायला कबूल होईल असा औरंगजेबाचा समज होता. खलिता हातीं येतांच विक्रमसिंहानें उत्तर लिहिलें, "मी दोन हजार स्वारांची फौज घेऊन ताबडतोब हुजुरांत हजर होतों."

औरंगजेबाला प्रश्न पडला, फौज कशाला? आपल्याला कुमक देण्यासाठीं विक्रमसिंह फौज घेऊन येत असावा असा औरंगजेबानें समज करून घेतला.

## : १३ :

● **सौंदर्याचा** महिमा केवढा विलक्षण आहे ! जेबुन्निसेची भेट होतांच मुबारक सारें कांहीं विसरून गेला. अधिकारमदानें धुंद झालेली ती पूर्वीची जेबुन्निसा भेटली असती तर काय झालें असतें कोण जाणे, पण आतांची ही जेबुन्निसा विनयशील होती, तिचा अभिमान गळाला होता, स्नेहाची ज्योत जागी होऊन ती अश्रुमयी झाली होती. मुबारकच्या हृदयाचा पूर्वीचा अनुराग संपूर्ण स्वरूपांत पुन्हां जागा झाला होता. दर्याबिबी दर्यांत वाहून गेली होती. स्त्रीजातीच्या प्रेमानें अंध झालेला पुरुष हिताहित आणि धर्माधर्म यांची जाणिव विसरून जातो. त्याच्यासारखा विश्वासघातकी, पापी कुणी नाहीं.

उदयसागराच्या कांठावरच्या त्या हजारों दिव्यांनी उजळलेल्या छावणींत जेबुन्निसेचा हात आपल्या हातांत घालून बसल्यावेळीं मुबारक देहभान विसरून

गेला होता. तो म्हणाला, "तूं मला पुन्हां मिळालीस. पण मला दुःख वाटतंय तें हें, कीं तुझा सहवास पुरते दहा दिवस देखील लाभणार नाहीं."

"असं कां म्हणतां ?" जेबुन्निसा म्हणाली, "कोण आड येतंय आपल्या ? बादशहा का ?"

"असा संशय येतोय मला !" मुबारक म्हणाला, "सध्यां मी बादशहाची गोष्ट बोलत नाहीं. उद्यां मला लढाईवर जायचं आहे. लढाईत जसं जीवन आहे तसं मरणही आहे, पण माझ्या पक्षीं मरण निश्चित आहे. रजपूतांनीं लढाईची जी कसोशीनं तयारी केली आहे ती मी पाहिली आहे. या पहाडी लढाईत रजपूतांचा पराभव करणं आमच्याकरवीं होणार नाहीं असं मला निश्चयपूर्वक वाटतं. एकदां मी हार खाऊन आलों, आतां पुन्हां हार खाऊन येणं शक्य नाहीं. या लढाईत मला मरावंच लागेल."

जेबुन्निसेच्या डोळ्यांत आसवें आलीं. ती गहिंवरून म्हणाली, "या लढाईत तुम्हाला खास जय मिळेल. ईश्वर एवढा निर्दय नाहीं. तुम्ही पुन्हां माझ्यापाशीं आला नाहीं, तर खात्रीनं माझा जीव जाईल."

दोघांच्याही डोळ्यांतून आसवांची झरणी लागली होती. मुबारक विचार करीत होता—मरावं कीं मरूं नये ? तो पुन्हां पुन्हां विचार करीत होता. आकाशांत चांदण्या चमकत होत्या. पण उदयसागरच्या चोहों बाजूला पर्वतांचं भिताड उभारलेलें असल्यामुळें जिकडे तिकडे काळोख पडला होता. पर्वतांच्या शिखरावर शिखरें असलेलीं त्यांना दिसत होतीं. जिकडे तिकडे काळोख ! बाहेर काळोख तसाच दोघांच्याही अंतःकरणांत काळोख !

तितक्यांत जेबुन्निसा एकदम दचकली आणि म्हणाली, "पहा, पहा. या काळोखांत तंबूच्या पडद्याच्या तटाजवळ कुणी तरी लपून राहिलाय असं वाटतं. मला भीती वाटते तुमच्याबद्दल."

"थांब पाहून येतों." असें म्हणून मुबारक एकदम बाहेर पडला. खरोखरच कुणीतरी तिथें लपून बसलें होतें. मुबारकनें त्या व्यक्तिला पकडलें. हात धरून वर उठवलें. लपलेली व्यक्ति उठून उभी राहिली. ती कोण आहे तें काळोखामुळें मुबारकला उमगलें नाहीं. त्या व्यक्तिला ओढून त्यानें पलिकडल्या दिव्यापाशीं नेलें. त्याला दिसून आलें, ती एक स्त्री होती. तिनें आपलें तोंड

कपड्यानें झांकून घेतलें होतें. तोंडावरचा कपडा ती काढूं देईना असें पाहून तिला एका पहारेकऱ्याच्या ताब्यांत देऊन तो पुन्हां जेबुन्निसेपाशीं आला.

त्यानें ती हकीकत जेबुन्निसेला सांगितली तेव्हां तिची जिज्ञासा जागी झाली. तिच्या सांगण्याप्रमाणें मुबारक तिला आंत घेऊन आला.

जेबुन्निसा तिला म्हणाली, " कोण तूं ? कां लपली होतीस ? तोंडावरचा बुरखा काढ पाहूं. "

त्या स्त्रीनें तोंडावरचा बुरखा फेंकून दिला.

दोघेंही चकित झालीं—ती दर्याबिबी होती.

निर्मळ आकाशांत ढग आलेले नसतांना एकदम वीज कोसळावी तसेंच तें झालें होतें. आनंदाच्या परमावधीच्या वेळीं त्याना तें दुश्चिन्ह वाटलें. तिघांपैकीं कुणीही तोंडांतून शब्द बाहेर काढला नाहीं.

बराच वेळ गेला. एक मोठा सुस्कारा सोडून मुबारक उद्गारला, " या अल्ला ! आतां मेलंच पाहिजे मला ? "

जेबुन्निसा गहिंवरून म्हणाली, " तर मग मलाही ! "

दर्या म्हणाली, " कोण तुम्ही ? "

" चल माझ्याबरोबर ! " असें म्हणून मुबारकनें तिला बाजूला घेतलें.

काकुळतीला येऊन मुबारकनें जेबुन्निसेचा निरोप घेतला.

## : १४ :

● **राजसिंह** हा राजनीतीप्रमाणेंच युद्धनीतींतही अत्यंत निष्णात होता. आपलें सारें सैन्य घेऊन मोगल लोक राण्याचें राज्य सोडून आटोक्याबाहेर जाईपर्यंत त्यानें आपली छावणी उठवली नव्हती, कीं आपल्या सैन्याच्या कुठल्याही विभागाची हालवाहालव केली नव्हती. तो स्वतः छावणींतच राहिला होता.

तितक्यांत बातमी आली कीं विक्रमसिंह रूपनगरहून दोन हजार फौज घेऊन चाल करून येत आहे. राजसिंह युद्धाच्या तयारीनें सरसावून राहिला.

एक स्वार राजसिंहाची भेट घेण्यासाठीं राजदूत म्हणून पुढें आला होता. राजसिंहाची भेट घेऊन त्यानें वर्दी दिली कीं रूपनगरचा राजा विक्रम सोळंकी महाराण्याच्या भेटीसाठीं ससैन्य येत आहे.

राजसिंह म्हणाला, " शिबिरांत येऊन भेटायचं असेल तर त्यांना म्हणावं एकटेच या. ससैन्य भेट घ्यायची असेल तर त्यांना म्हणावं छावणीच्या बाहेरच थांबा. मीही ससैन्यच येऊन भेटेन. "

विक्रम सोळंकीनें शिबिरांत येऊन एकट्यानेंच भेट घेण्याचें कबूल केलें. तो आंत येतांच राजसिंहानें उत्थापन देऊन त्याचें स्वागत केलें. विक्रमसिंहानें राण्याला नजराणा सादर केला. उदयपुरचा राणा हा रजपूत कुळाचा म्होरक्या होता. अर्थात् रीती प्रमाणें त्याला नजराणा देणें अवश्य होतें.

राजसिंहानें त्या नजराण्याचा स्वीकार केला नाहीं. तो म्हणाला, " हा नजराणा खुशाल मोगल बादशहाला नेऊन द्या. "

विक्रमसिंह म्हणाला, " महाराणा राजसिंह जोंवर जीवित आहे, तोंवर मोगल बादशहाला नजराणा द्यायला कुठलाही रजपूत पुढं सरसावणार नाहीं. महाराज, मला आपण क्षमा केली पाहिजे. मी अजाणपणें तें पत्र लिहून गेलों. आज मोगलाला तुम्ही ज्याप्रकारें पिटाळून लावलं तें पाहून मला वाटतं, कीं सारे रजपूत एकत्र होऊन तुमच्या हाताखालीं लढायला तयार होतील तर मोगलांचं साम्राज्य नाहींसं होईल. माझ्या पत्राचा शेवटचा भाग आपण आठवून पहा. मी नुसता नजराणा देण्यासाठींच आलों नाहीं. मी आणखी दोन वस्तु आपल्याला देण्यासाठीं घेऊन आलों आहें. एक, माझे दोन हजार घोडेस्वार. दुसरी, माझी स्वतःची तलवार ! आजसुद्धां माझ्या या बाहूंत शक्ति आहे. ज्या कामगिरीवर आपण माझी योजना कराल, ती कामगिरी संपन्न करण्यासाठीं मी माझा देहसुद्धां सांडीन. "

तें ऐकून राजसिंहाला अत्यंत आनंद झाला. तो म्हणाला, " आपलं आजचं हें भाषण सोळंकीच्या ब्रीदाला शोभेसं आहे. या चांडाळ मोगलाचा आज निःपात झाला असता, पण त्यानीं तह केल्यामुळं आज ते बचावले होते सुटका होतांच ते उलटले आणि आतां म्हणताहेत कीं आपण तह केलाच नव्हता म्हणून. आपण अगदीं योग्य वेळीं इथं येऊन पोंचलां आहां. दिलेरखाँ अकबराला भेटायला जातो आहे, त्याला वाटेंतच गांठून नामोहरम केलं नाहीं तर कुमार जयसिंह संकटांत सांपडेल. त्या कामगिरीवर मी गोपिनाथ राठोडला पाठवणार होतों, पण त्याची फौज अगदीं थोडी आहे. माझ्या पदरची कांहीं

फौज मी त्याच्याबरोबर देणार आहें आणि माणिकलाल सिंह नांवाचा आमचा जो एक कुशल सेनापती आहे तो त्याच्याबरोबर जाणार आहे. औरंगजेब अजून दूर गेला नाहीं म्हणून मला ही छावणी सोडून सध्यां जातां येत नाहीं, कीं माणिकलालबरोबरही अधिक फौजही देतां येत नाहीं. म्हणून म्हणतों, कीं आपण आपले घोडेस्वार घेऊन त्यांच्याबरोबर लढाईवर जा. या तिन्ही फौजा एकत्र करून वाटेंत दिलेरखाँला गांठा आणि त्याचा संहार करा. ”

विक्रमसिंह आल्हादित होऊन म्हणाला, “ आपली आज्ञा मला शिरोधार्य आहे. ”

विक्रम सोळंकी लढाईवर जायच्या तयारीला लागला. चंचलकुमारीची गोष्ट बोलायचें तसेंच राहून गेलें.

## : १५ :

● **गोपिनाथ** राठोड, विक्रम सोळंकी आणि माणिकलाल दिलेरखाँचा धुव्वा उडवण्यासाठीं चाल करून जात होते. ज्या वाटेनें दिलेरखाँ येत होता, त्या वाटेच्या तीन बाजूला तिघेजण छपून राहिले होते, पण ते एकमेकांपासून फार दूर नव्हते.

विक्रम सोळंकी घोडेस्वार घेऊन आलेला असल्यामुळें त्याला डोंगरपठारावर राहणें शक्य नव्हतें. त्याचा मुलुख जरी पहाडी होता, तरीही पहाडाखालच्या प्रदेशांत रहाणारे त्याचे शत्रू आणि डाकू यांचा पाठलाग करण्यासाठीं घोडदळ ठेवणें त्याला अवश्य झालें होतें. त्यावेळचे जे छोटे छोटे राजे होते, ते रात्रीची संधि साधून आपल्या आजूबाजूच्या दहा पांच गांवांत डाके घालून गांव लुटीत असत. आपले घोडे पहाडावर सोडून देऊन त्यांचे सैनिक खालीं पायदळी छापे घालीत असत. यावेळीं मोगलांचा पाठलाग करण्याची जरूरी असल्यामुळें विक्रमसिंह घोडदळ घेऊन आला होता, त्यामुळें पहाडी लढाईच्या दृष्टीनें त्याला अडचण झाली होती. तेवढ्यासाठीं त्यानें पहाड चढून न जातां सपाट प्रदेश शोधून काढायला सुरवात केली आणि तशी सोयीस्कर जागाही त्याला आढळली.

त्या जागेच्या समोरच जंगल होतें. त्या जंगलाच्या मागच्या बाजूला आपले घोडेस्वार उभे करून ठेवून तो सर्वांच्या पुढें झाला होता. त्याच्या मागोमाग

माणिकलाल राजसिंहाचें पायदळ सैन्य घेऊन छपून बसला होता आणि सर्वांच्या मागें गोपिनाथ राठोड होता.

अकबराची झालेली दुर्दशा ध्यानीं घेऊन दिलेरखान सावधपणेंच चाल करून येत होता. कुठें रजपूत लोक टपून बसले आहेत कीं नाहीं हें पहाण्या-साठीं तो आपले घोडेस्वार आघाडीवर पाठवीत होता. या टेहेळ्यांनीं विक्रम सोळंकीचे घोडेस्वार दबा धरून बसल्याची बातमी त्याला दिली, त्यावेळीं त्या घोडदळाला उधळून लावण्यासाठीं आपलें कांहीं सैन्य त्यानें पुढें पाठवलें.

स्वाभाविकपणें विक्रम सोळंकी हा इतर विषयांच्या बाबतींत थंड्या प्रकृतीचा असला तरी लढाईच्या बाबतींत मात्र अति सावध आणि धूर्त होता. लढाईत धूर्तपणा हेंच कौशल्य ठरतें. मोगल सैन्याशीं थोडीशी झटापट करून माघार घेतली, यांतच त्याचें कौशल्य होतें.

दिलेरखाँ सरळ पुढें चालला होता. मागच्या बाजूला माणिकलाल छपून बसल्याचा त्याला पत्ता लागला नव्हता. माणिकलालनेंही त्यावेळीं कसलीच हालचाल केली नाहीं. सोळंकीची हकालपट्टी केली, अर्थात् सारे रजपूत मागें हटले अशी कल्पना करून पूर्वीच्याइतकी सावधगिरी न ठेवतां दिलेरखाँनें पुढें कूच करायला सुरवात केली होती. चढाव करून जायला ही संधि योग्य नव्हे असा विचार करून माणिकलालही थोपून राहिला होता.

यानंतर जिथें गोपिनाथ राठोड लपून बसला होता, त्या जागेच्या जवळपास दिलेरखाँ येऊन पोंचला. तिथला पहाडांतला रस्ता अगदीं चिंचोळा होता. दिलेरखाँचें सैन्य त्या चिंचोळ्या रस्त्यांत शिरलें असें पाहून गोपिनाथ राठोड आपल्या फौजेसह पुढें सरसावला आणि त्यांची लढाई जुंपली.

समोरचें सैन्य घेऊन गोपिनाथच्या सैन्यावर तुटून पडण्यासाठीं दिलेरखाँनें मुबारकला हुकूम सोडला. मुबारक पुढें झाला खरा, पण गोपिनाथ राठोडच्या फौजेला हरवणें त्याला शक्य झालें नाहीं. चिंचोळ्या रस्त्यांतून बाहेर पडणाऱ्या मोगलावर गोपिनाथनें झडप घातली आणि मुलें जशीं वारुळांतून बाहेर पडणाऱ्या मुंग्या एक एक मारून टाकतात, तशीच रजपूतांची फौज त्या चिंचोळ्या वाटेंतून येणाऱ्या मोगलांना कापून काढूं लागली. समोर रस्ता बंद

झालेला असल्यामुळें दिलेरखाँ आपली फौज घेऊन रस्त्याच्या मध्यभागीं अडकून स्वस्थ राहिला होता.

माणिकलालला हीच संधि योग्य वाटली. पहाडावरून खालीं उतरून आपल्या फौजेसकट त्यानें दिलेरच्या फौजेवर हल्ला केला. दिलेरखाँचें सैन्य जिवावर उदार होऊन लढूं लागलें होतें, तोंच मागें हटून राहिलेला विक्रम सोळंकी आपले दोन हजार घोडेस्वार घेऊन मागच्या बाजूनें दिलेरखाँवर चाल करून आला.

अशा प्रकारें तीनही बाजूनें आक्रमण झाल्यामुळें मोगल सेनेची दाणादाण उडाली. प्रत्येक सैनिक कसाबसा पळ काढायचा प्रयत्न करीत होता, पण पुष्कळांनाच पळून जायला वाट सांपडली नाहीं. रजपूतांनीं ती मोगलाची फौज कडबा कापल्यागत झराझर कापून काढली.

कांहीं कांहीं मोगल योद्धे गोपिनाथ राठोडला मोठ्या आवेशानें तोंड देत होते. मृत्युची पर्वा न करतां ते सारखे लढत होते. त्यांतला कुणीच मागें हटत नव्हता. मोगल सेनेंतले हे वेंचक वेंचक लढवय्ये होते आणि मुबारक त्यांचा नेता होता.

पण शेवटीं त्यांचाही टिकाव लागणें अशक्य झालें. चोंहीकडून होणाऱ्या रजपूतांच्या माऱ्यापुढें ते बेजार होऊन शेवटीं रजपुतांच्या तलवारीला बळी पडले.

त्यांतील चार दोन आसामी शिल्लक राहिले आहेत असें दुरून माणिकलालच्या दृष्टीला आल्यामुळें तो धांवतच पुढें आला आणि रजपूत सेनेला हांक मारून म्हणाला, “ यांना मारूं नका. हे वीरपुरुष आहेत. यांना असेच सोडून द्या. ”

रजपूत सैनिक एकदम थांबले. त्यावेळीं माणिकलाल त्या मोगलांना म्हणाला, “ आतां तुम्ही निघून जा. तुम्हाला मी मोकळीक दिली आहे. माझ्या हुकुमानं यापुढें तुम्हाला कुणीही अडविणार नाहीं. ”

त्यांतला एक मोगल म्हणाला, “ आजवर लढाईत आम्ही कधीं पीछेहाट घेतली नाहीं—आजही घेणार नाहीं—” असें म्हणून ते पुन्हां लढाई करायला

रसावले असें पाहून माणिकलाल मुबारकला हांक मारून म्हणाला, " खाँ-
हेब, आतां लढतांहां कशासाठीं ? "

" मरण्यासाठीं ! " मुबारक म्हणाला.

माणिकलालनें विचारलें, " असे जिवावर उदार झालांत कां ? "

मुबारक म्हणाला, " मरण्याखेरीज मला दुसरी गति नाहीं हें माहित नाहीं
तुम्हाला ? "

" मग लग्न केलंत कशासाठीं ? " माणिकलालनें विचारलें.

मुबारक म्हणाला, " मरण्यासाठीं ! "

याचवेळीं बंदुकीच्या आवाजानें तो पहाड दणाणून गेला. सूं सूं करीत एक
ळी आली. त्या आवाजाचे पडसाद कानीं येतात न येतात तोंच मस्तकाला
ळी लागून मुबारक खालीं पडला.

मुबारकचा प्राण गेला होता.

माणिकलालनें चोंहीकडे नजर फेंकली—एक स्त्री हातांत बंदूक घेऊन
लेकडल्या टेकाडावर उभी होती. बंदुकीच्या नळीवाटे धूर येऊन गेला होता.

ती पागल झालेली दर्याबिबी होती.

तिला पकडण्यासाठीं माणिकलालनें शिपाई पाठवले, पण ती हंसत हंसत
टून गेली.

त्यानंतर दर्याबिबी या पृथ्वीवर कुणालाच कधीं दिसली नाहीं.

लढाईची बातमी जेबुन्निसेच्या कानीं गेली. लढाईंत मुबारक मेल्याचें तिला
ळलें, तेव्हां वेषभूषा फेकून देऊन उदयसागरच्या दगडी भूमीवर अंग
कून ती रडूं लागली—

**वसुधालिंगन धूसरस्तनि ।**
**विललाप विकीर्णमूर्धजा ॥**

**: १६ :**

**लढाईंत** विजयश्री संपादन करून विक्रमसोळंकी राजसिंहाच्या शिबिरांत
ऊन पोंचला. राजसिंहानें त्याला प्रेमभरानें आलिंगन दिलें.

विक्रम सोळंकी म्हणाला, "आतां एकच गोष्ट राहिली आहे—माझी ती मुलगी. कायामनोवाक्यानें आशीर्वाद करून ती माझी मुलगी आपल्या हातीं द्यावी अशी माझी इच्छा आहे. तिचा स्वीकार कराल ना?"

राजसिंह म्हणाला, "तर मग चला उदयपुरला."

विक्रम सोळंकी आपली फौज घेऊन उदयपुरला गेला.

त्याच रात्रीं राजसिंहानें चंचलकुमारीचें पाणिग्रहण केलें.

यापुढें घडलेल्या घटना सांगण्याचा अधिकार आहे इतिहासकाराचा. कांदबरीकाराला ती उठाठेव कशाला हवी!

यानंतर औरंगजेब स्वतः राजसिंहाचा सर्वनाश करण्यासाठीं पुढें सरसावला. अजीमशहा औरंगजेबाला येऊन मिळाला. राजसिंहानें मेवाडच्या दुर्गादासची मदत घेतली आणि ते दोघेही औरंगजेबावर चाल करून गेले.

आणखी एकवार औरंगजेब पराजित आणि अपमानित होऊन कुत्र्यासारखें शेंपूट घालून पळत सुटला. औरंगजेबाची प्रचंड सेना उध्वस्त झाली. रजपूतांनीं त्यांचें सर्वस्व लुटून नेलें.

औरंगजेब आणि अजीमशहा जे पळून गेले ते चितोडला जाऊन पोंचले. त्यावेळीं ती राजधानी राण्यानें सोडली होती पण तिथेंही त्याला आसरा मिळाला नाहीं. सुबलदास नावाचा एक रजपूत सेनापती त्याच्या मागोमाग गेला आणि त्यानें आपली फौज चितोड आणि अजमीर यांच्या मध्यभागीं उभी केली.

पुन्हां रसदबंदीचा प्रसंग आला असें पाहून औरंगजेबानें खान रोहिल्याला बारा हजार फौज घेऊन सुबलदासबरोबर लढण्यासाठीं पाठवून दिलें. स्वतः औरंगजेब अजमीरला पळून गेला. त्यानंतर उदयपुरचें तोंड पहाणें त्याला लाभलें नाहीं. त्याची ती महत्त्वाकांक्षा तशीच अपुरी राहिली.

इकडे सुबलदासनेंही खान रोहिल्याची यथास्थित खबर घेतली. सुबलदासच्या हातचा फटका खाऊन खान रोहिलाही अजमीरला पळून गेला.

तिकडे राजसिंहाचा दुसरा मुलगा कुमार भीमसिंह गुजरात विभागांत घुसला होता. मोंगलांच्या ताब्यांत असलेला सारा प्रदेश आणि छोटीं मोठीं शहरें आणि गांवें त्यांनीं काबीज केलीं. मोगल सुभेदाराची राजधानीही त्यानें लुटली.

अशा प्रकारें एक एक गांव काबिज करीत सौराष्ट्रापर्यंत राजसिंहाचा अधिकार स्थापन करण्याचा त्याचा उद्देश होता, पण हवालदिल झालेली प्रजा राजसिंहाला शरण आली. राजसिंहाला त्यांच्या दुःखाची यथार्थ कल्पना झाल्यामुळें दयाभूत अंतःकरणानें त्यानें भीमसिंहाला मागें बोलावून घेतलें. ती मोहिम तेवढीच राहिली.

पण राजमंत्री दयाळ शहा त्या प्रकृतीचा माणूस नव्हता. त्यानेंही लढाईला तोंड दिलें होतें. मालव देशांतून मुसलमानांना हुसकून काढायची त्यानें सुरवात केली होती.

औरंगजेबानें हिंदु धर्मीयावर अनेक अत्याचार केले होते. त्या अत्याचाराचा सूड घेण्यासाठीं दयाळ शहा, काजी सांपडले कीं त्यांची दाढी मिशी बोडून त्यांना बांधून टाकीत असे. कुराण दिसलें कीं ते कुव्यांत फेकून देत असे.

दयाळ शहानें कुमार जयसिंहाच्या फौजेला गांठलें. दोन्ही फौजा एकत्रित होऊन शहाजादा अजीमवर चाल करून गेल्या. चितोडच्या नजिक त्यांचें घनघोर युद्ध झालें. अजीमच्या सैन्याचा धुव्वा उडाला आणि पराजित झालेला अजीम शेवटीं पळून गेला.

चार वर्षेपर्यंत ही लढाई सुरू होती. पावलापावलाला मोगल पराजित होत होते. शेवटीं औरंगजेबानें खरोखरच तह केला. राण्यानें घातलेल्या सर्व अटी औरंगजेबानें मुकाट्यानें कबूल केल्या इतकेंच नव्हे, तर राण्यानें पूर्वी घातलेल्या अटीपेक्षांही जास्त अटी यावेळीं कबूल करणें त्याला भाग पडलें.

मोगलांना यापूर्वी अशी शिक्षा कधींच मिळाली नव्हती.

♣

# उपसंहार

♠ **हिंदु** आणि मुसलमान यांच्यांतल्या बरेवाईटपणाचा निर्देश करण्यासाठीं ग्रंथकारानें हा ग्रंथ लिहिलेला नाहीं. हिंदु असला तरी तो सज्जन असतो असें नाहीं, मुसलमान असला तर तो दुर्जन असतो असेंही नाहीं—तसेंच हिंदु म्हणजे कांहीं सारेच दुर्जन नव्हत आणि मुसलमानही सारेच सज्जन नव्हत—दोघांतही बरेवाईट लोक आहेतच. त्यांची तुलना कशाला हवी !

ज्याअर्थी मुसलमानांनीं एक शताब्दिपर्यंत भारतवर्षावर प्रभुत्व केलें, त्याअर्थी राजकारणाच्या दृष्टीनें तत्कालीन हिंदूंपेक्षां मुसलमान अवश्य श्रेष्ठ होते हें कबूल केल्याशिवायाय गत्यंतर नाहीं. म्हणजे सारेच मुसलमान राजे साऱ्याच हिंदु राजांपेक्षां श्रेष्ठ होते असें म्हणणेंही बरोबर नाहीं. बरींचशीं उदाहरणें अशी दाखवतां येतील, कीं राजकारणांत मुसलमानांपेक्षां हिंदु श्रेष्ठ होते.—तशींच हिंदुंपेक्षां राजकीय गुणांत मुसलमान श्रेष्ठ असल्याचीं उदाहरणेंही दाखवतां येतील. इतर कोणत्याही गुणांपेक्षां ज्यांची धर्मभावना श्रेष्ठ होती, ते हिंदु असोत कीं मुसलमान असोत, सर्व दृष्टीनें श्रेष्ठ होते. दुसरे गुण कितीही उच्च प्रतीचे असले तरी जे धर्महीन होते ते हिंदु असोत कीं मुसलमान असोत, सर्वस्वी निकृष्ट होते.

औरंगजेब धर्मलंड होता, म्हणूनच त्याच्या अमदानीपासून मोगल साम्राज्याच्या अधःपाताची सुरवात झाली.

राजसिंह धार्मिक होता, म्हणून छोट्याशा राज्याचा अधिपती असूनही पराक्रमी मोगल बादशहाला पराजित करायला तो समर्थ झाला.

या ग्रंथाचा प्रतिपाद्य विषय एवढाच.

राजा जसा असेल तसेच त्याचे अनुचर आणि पौरजनही असतात. उदेपुरी आणि चंचलकुमारी, जेबुन्निसा आणि निर्मलकुमारी, माणिकलाल आणि मुबारक यांची परस्पर तुलना केली असतां या सिद्धांताचें प्रत्यंतर येईल. एवढ्यासाठींच या साऱ्या कल्पना.

परदेशांतील इतिहासाशीं तुलना करून पाहिलें तर औरंगजेबाची स्पेनच्या दुसऱ्या फिलिपबरोबर तुलना करतां येईल. दोघेही एका मोठ्या साम्राज्याचे अधिपती. दोघेही श्रमशील होते, धूर्त होते, पराक्रमी होते, पण दोघेही निष्ठूर होते; स्वार्थी होते. कपटाचरणी, क्रूर, दांभिक आणि प्रजापीडक होते. म्हणूनच दोघांनींही आपापल्या साम्राज्याच्या नाशाचीं बीजें रोंवलीं. दोघेही छोट्याशा शत्रूच्या हातीं पराजित झालें. इंग्रज (त्यावेळीं छोटा होता) आणि पोलंदाजाच्या हस्तें फिलिप आणि मराठे आणि रजपूतांच्या हस्तें औरंगजेब पराभूत झाला. मराठ्यांचा शिवाजी आणि इंग्लंडची तत्कालिन नेत्री एलिझाबेथ या दोघांची तुलना करतां येईल. पण त्याहीपेक्षां पोलंदाज विल्यम आणि रजपूत राजसिंह या दोघांची तुलना अत्यंत अनुरूप होईल. दोघेही अतुल कीर्तिमान.

देशहितैषी धर्मात्मा वीरपुरुष म्हणून विल्यम हा युरोपांत प्रख्यात झाला— या देशाला इतिहास नाहीं, अर्थात् राजसिंहाला कुणी ओळखीत नाहीं.

— समाप्त —